ध्यायश्लोक येरितींबोलिलाहरी ॥ ३३ ॥ श्लोक ॥ ॥ यइदंपर
मंगुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ॥ भक्तिमयिपरांकृत्वा मामेवैष्यत्यसं
शयं ॥ ६८ ॥ ॥ ऐसाअष्टादशाध्याय श्लोकश्लोकार्थतोअसा ॥
कींजोहेंगुह्यपरम सांगेपावेचतोमला ॥ ३४ ॥ कैसेंयाश्रोतयांमी
जी सांगावेंकवणेरितीं॥ वक्ताह्मणेलतरितें याश्लोकींकृष्णबोलतो॥
॥ ३५ ॥ कींमाझेभक्तत्यांमध्यें माझेठायींचभक्तिजे ॥ करूनिथो
रतेसांगे तोपावेमजनिश्चित ॥ ३६ ॥ अर्थआणीकहीहोतो कींहें
सांगेलगुह्यजो ॥ पावेलमाझेठायींतो भक्तिथोरकरूनियां ॥ ३७॥
परंतुहाअर्थयेथें बोलतांबाधलागतो ॥ कींसांगण्याचेंफळतो न
व्हेजेत्यासपावणें ॥ ३८ ॥ करिभक्तिहितोत्यातें पावेलचिनसंशय॥
तेव्हांभक्तांतगीतार्थ कथनाचेंनहेंफळ ॥ ३९ ॥ माझेठायींभक्तिती
तें जोथोरकरुनीवदे ॥ तोपावेमजहाअर्थ मुख्यआणिअबाधित ॥
॥ ४० ॥ तरिज्ञानावीणमुक्ती नघडेभक्तिसाध्यते ॥ मागतीभक्तिनें
मुक्ती ह्मणालतरिआइका ॥ ४१ ॥ मुक्तिश्रवणमात्रेंची परीक्षित्
पावलापरी ॥ श्रवणेंचितयालभ्य ज्ञानवैराग्यभक्तिही ॥ ४२ ॥ तै
सेंगीतार्थकथन भक्तिथोरकरूनिजो ॥ सांगेलतोज्ञानहीन हेंकदा
पिनबोलवे ॥ ४३ ॥ रहस्यचिनजाणेजो आत्मैक्यतत्त्वभक्तिचें ॥
तोभक्तिथोरकरुनी कायभक्तांतवर्णिल ॥ ४४ ॥ तस्मात्आत्मज्ञ
होत्सातां ज्ञानसिद्धीसपावला ॥ तोगीतार्थअसावर्णी स्थितिबाणेत
यासही ॥ ४५ ॥ मातेंपावेह्मणेकृष्ण तेंत्याचेंहेंचिपावणें ॥ कींभ
क्तियोगेंजेसिद्धि तेचिगीतार्थवर्णन ॥ ४६ ॥ परीक्षित्श्रवणेंसिद्ध
हेंगीतार्थनिरूपण ॥ तस्मात्गीतार्थतोमुख्य कींजेंमुख्यत्वभक्ति
चें ॥ ४७ ॥ द्वैतभक्तीनव्हेतेतों त्रिदोषाभक्तियास्तव ॥ लक्षणत्रय
अद्वैत युक्ततेभक्तिकेवळ ॥ ४८ ॥ हेभक्तिथोरकरुनी गीताटीका
निरूपण ॥ मुख्यहेंचरमाध्याय श्लोकींयास्पष्टसाधिलें ॥ ४९ ॥

कोणीनिर्गुणमार्गींच ज्ञानमार्गउपासना ॥ करुनीसगुणप्रीती नि षेधतिततःपर ॥ ५० ॥ बहुक्लेशेंतयासिद्धि आणिआत्मज्ञहोउनी ॥ भजतांसगुणींऐक्य शीघ्रसिद्धीसपावती ॥ ५१ ॥ हेंचियाद्वादशा ध्यायीं बोलेलभगवान्स्वयें ॥ प्रश्नोत्तरींअर्जुनाच्या तरितोअर्थ मोडती ॥ ५२ ॥ कींजयांकळलाआत्मा तेहीसगुणसेविती ॥ हेंसि द्धहोतेंह्मणुनी अर्थहीमोडितींवळें ॥ ५३ ॥ ह्मणतीहेज्ञानहीन सगु णोपासनापर ॥ तरीज्ञानाहुनीथोर अज्ञकैसेंवदेहरी ॥ ५४ ॥ भक्त जेसप्तमाध्यायीं चतुर्विधनिरूपिले ॥ ज्ञानश्रेष्ठचहूंमाजी तेथेंहरिच बोलिला ॥ ५५ ॥ तेथेंज्ञानाहुनीअज्ञ ह्मणेलश्रेष्ठजेधवां ॥ सर्व ज्ञाचीद्विधावाणी परस्परविरुद्धकीं ॥ ५६ ॥ यालागींभक्तजेयेथें युक्तआणीकसंमत ॥ ह्मणेश्रीकृष्णतेज्ञानी अज्ञानीहेंह्मणोंनये ॥ ॥ ५७ ॥ सगुणोपासकज्ञानी तेयुक्तममसंमत ॥ ह्मणोनिमगसांगे ल निर्गुणोपासनापर ॥ ५८ ॥ तव्हांअयुक्ततेंआणि असंमतहिभा वहा ॥ नबोलोनिहिबोलेल कींतेकष्टतियास्तव ॥ ५९ ॥ निर्गुणो पासनामात्र करितीत्यांसबोलहा ॥ नसोसेह्मणुनीयेथें करितीक्लि ष्टकल्पना ॥ ६० ॥ ह्मणतीबोलिलेंहेजे निर्गुणोपासनापर ॥ तेतो देहाभिमानीजे आत्मज्ञामाजितेअसे ॥ ६१ ॥ श्लोकांतपांचव्या दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ह्मणोनिबोलिलाकृष्ण याचाहाभावका ढिती ॥ ६२ ॥ परंतुअर्जुनप्रश्न असतांयेरितीजरी ॥ तरीहाअर्थ घडता अन्यथाकल्पनावृथा ॥६३॥ आणिश्लोकांचतुर्थांत त्याची जीलक्षणेंस्फुटें ॥ पाहतांसाधनेंत्यांची नसाहेगोष्टिहेतयां ॥६४॥ जेइंद्रियांतेंदमिती सर्वत्रसमबुद्धिजे ॥ तेकसेअभिमानीजे सर्वभूत हितीरत ॥ ६५ ॥ श्लोकांतपांचव्यादुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ह्म णोनिबोलिलात्याचा अर्थयेथेंअशारितीं ॥ ६६ ॥ कींदेहवंतते देहीं जीवचित्प्रतिबिंबजो ॥ तेंबिंबनिरुपाधित्वें अव्यक्तत्वेंउपासि

ती ॥ ६७ ॥ त्यादेहवंतींदुःखेंही अव्यक्तगतिपाविजे ॥ येथेंदेहा भिमानीजे ह्मणावेकांअहोबळें ॥ ६८ ॥ यालागिदेहाभिमानी ज्ञानीहितोंनबोलवे ॥ सगुणींप्रियहीअज्ञ बोलिलाहेंनबोलवे॥६९॥ कोणीह्मणतिकींयेथें अधिकारधनंजया ॥ देखोनिबोलिलाश्रेष्ठ सगुणोपासनापरं ॥ ७० ॥ तरींत्याचीकायभीड कींतयाकारणेंन्ह षा ॥ ज्ञानियाहूनिअज्ञान श्रेष्ठत्वेंएथबोलिला ॥ ७१ ॥ आतांह्म णालकींत्याला अधिकारनसोनिही॥ भजेझणींनिर्गुणींतो याभावें बोलिलाअसे ॥ ७२ ॥ तरीपायरियानाना याअध्यायींनबोलतां॥ कींध्यानींचित्तथारेना तरींअभ्यासतूंकरी ॥ ७३ ॥ अभ्यासही नव्हेतेव्हां माझींकर्मेंचआचर ॥ इत्यादिक्रमजोबोले तोअज्ञश्रेष्ठ कांह्मणे ॥ ७४ ॥ निर्गुणोपासनातूज नठाकेजरिअर्जुना ॥ सगु णोपासनानिष्ठ होयहेंकांनबोलवे ॥ ७५ ॥ श्रेयोहिज्ञानमभ्या सात् ज्ञानात्ध्यानंविशिष्यते ॥ याहीश्लोकींएकएका परीसश्रे ष्ठबोलिला ॥ ७६ ॥ टाकूनियांस्वाधिकार झणींउंचपदाप्रती ॥ जातांहोईलहाकष्टी असेंकांहोनशंकला ॥ ७७ ॥ आतांहेअ र्जुनालागी सगुणोपासनाजरी ॥ बोलिलाह्मणतांतोही आलज्ञ चिनअज्ञतो ॥ ७८ ॥ पूर्वाध्यायींपहिलिया श्लोकींअर्जुनबो लिला ॥ कींमाझामोहयागुह्य अध्यात्मेंसर्वनासला ॥ ७९ ॥ तस्मात्अर्जुनहीज्ञानी ज्ञानीसगुणसेवक ॥ तेंसंमतश्रीहरिला नअ व्यक्तउपासक ॥ ८० ॥ सगुणप्रीतिमगकां चिदात्माकळल्याव री ॥ ज्ञानीस्वमुखचंद्रींहा स्वकलंकनिरूपिती ॥ ८१ ॥ वत्सापह र्णींब्रह्म स्तुतिभागवतामधें ॥ तिचीटीकात्रिचरणी तेथेंहापक्षखं डिला ॥ ८२ ॥ चरणींपहिल्याकांहीं कांहींतिसरियांतही ॥ हाप क्षवामनमुखें श्रीहरीनेंचिखंडिला ॥ ८३ ॥ तैसेंचवामनमुखें हरि नामसुधेंतही ॥ देशभोषेचकरुनी पक्षहादूषिलाअसे ॥ ८४ ॥ तै

साचसंस्कृतग्रंथ श्रुतिसारह्मणूनियां ॥ हाशुष्कद्वैतवाद्यांचा पक्षते थेंहिदूषिला ॥ ८५ ॥ आत्माचकळलातेव्हां गुरुभक्तीहिकांअ सें ॥ पुसतांतेकृतघ्नत्व परिहारार्थबोलती ॥ ८६ ॥ तुह्मीब्रह्मतुह्मा लाहि कांकृतघ्नत्वपूसतां ॥ निमित्तमागतीकांहीं गुरुभक्त्यर्थदावि ती ॥ ८७ ॥ गुरुभक्तीनिमित्तेंजे त्यानिमित्तेंचईश्वरा ॥ सगुणा लानभजती सर्वहीज्ञानमानिता ॥ ८८ ॥ गुरुचीआणिदेवाची क रितांभक्तिजेगुरु ॥ बोलिलाअर्थतेयाला प्रकाशतिह्मणेश्रुति॥ ८९॥ ॥ श्रुतिः ॥ यस्यदेवेपराभक्ति र्यथादेवेतथागुरौ ॥ तस्यैतेकथि ताह्यर्थाः प्रकाशंतेमहात्मनः ॥ ॥ श्रुत्यर्थकींभक्तिज्याची उत्कं ठेंपरमेश्वरीं ॥ जसीदेवींतसीभक्ती गुरुचीहीकरीजरी ॥ ९० ॥ त्या लाजेबोलिलेअर्थ गुरूनेंशास्त्रसंमत ॥ प्रकाशतीतेतयातें तेव्हांजे व्हांभजेअसा ॥ ९१ ॥ ज्यादेवासारिखीभक्ती गुरूचीश्रुतिबोलते ॥ त्यादेवाचीचहेभक्ती टाकितीउडवूनियां ॥ ९२ ॥ तस्मात्गुरूची देवाची आत्मैकाभक्तिजोकरी ॥ त्यालागुरूक्तआत्म्याची स्थिति बाणेनअन्यथा ॥ ९३ ॥ आत्मत्वश्रवणातेंजे साक्षात्कारत्वमानि ती ॥ त्यांचींहींबोलणींशास्त्रीं पांडित्याच्याबळेंअशीं ॥ ९४ ॥ गुरु सेवाकृतघ्नत्व परिहारार्थजेधवां ॥ नज्ञानपरिपाकार्थ स्वमुखेंबोल तीअसें ॥ ९५ ॥ ज्ञानाभिमानतोहाची असोहेंफोलबोलणें ॥ ज्ञानीनिरभिमानीही कष्टतीसगुणाविण ॥ ९६ ॥ अर्जुनाच्याप्र श्नमिषें हेंचिबोलेलमाधव ॥ अर्जुनेंप्रश्नकांयेथें केलातोहेतुआइ का ॥ ९७ ॥ श्लोकद्वयेंवासुदेवें पूर्वाध्यायांतशेवटीं ॥ वर्णिलाभ क्तआत्मज्ञ तेथेंअर्जुनशंकला ॥ ९८ ॥ हेंबरेंकींभजतिजे निर्गुणा तेंचितेंबरें ॥ करूंहाप्रश्नसर्वज्ञा प्रतिहेंधरिलेंमनीं ॥ ९९ ॥ करील प्रश्नयाभावें श्रीकृष्णाप्रतिअर्जुन ॥ तेथूनियांसमश्लोकी संगति श्लोकहेपृथक् ॥ १०० ॥

## श्लोक १

अर्जुनउवाच

**एवंसततयुक्तायेभक्तास्त्वांपर्युपासते॥**
**येचाप्यक्षरमव्यक्तंतेषांकेयोगवित्तमाः॥**

## समश्लोकी १

ऐसेतत्त्वींसदायुक्त भक्तजेभजतीतुतें॥
कोणीनिर्गुणमात्रातें त्यांतउत्तमकोणते॥

## आर्या १

संततयुक्तअसेजे उपासितीभक्ततुजतुझ्याचिमतें॥
अक्षरअव्यक्तभजति त्यांतहितेकोणयोगवित्तमते॥

## दोहरा १

जेसेवततुमकोंसदा करीकरमनकेसाज॥
अच्छरब्रह्मजेंभजत वहेकोंनहीराज॥

## ओवी १

तूंविश्वरूपह्मणूनकरितीभजन॥ एकअक्षरअव्यक्तऐसेंजाणोन॥
तरीदोहींमध्येंश्रेष्ठकोण॥ तेंसांगमजप्रती॥

## अभंग १

जाणुनिश्रीपतीचेंमन॥ द्वादशप्रसंगींअर्जुन॥ १॥
जीवींविचारीकींहीत हेंचअसल्यासंतत॥ २॥
मगआपणवंचूंनये॥ देवादिसंअंतराये॥ ३॥
तरीविश्वरूपाचिया॥ प्रशंसीतोवाक्यमया॥ ४॥
तरीअव्यक्तचांगलें॥ किंवाकृष्णरूपभलें॥ ५॥
बरेंएकवेळांपुसों॥ मगतैशास्थितींवसो॥ ६॥
ह्मणोनिबोलेहर्पमय॥ अहोयादववंशराय॥ ७॥

असेतत्त्वींसदायुक्त ॥ भक्तमुजजेभजत ॥ ८ ॥
कोणीनिर्गुणमात्रातें ॥ त्यांतउत्तमकोणते ॥ ९ ॥
सांगेमहाराजभक्ताच्या ॥ प्रीतिठेवातुकयाच्या ॥ १० ॥

## श्लोक २

श्रीभगवानुवाच

मय्यावेश्यमनोयेमांनित्ययुक्ताउपासते ॥
श्रद्धयापरयोपेतास्तेमेयुक्ततमामताः ॥

## समश्लोकी २

मनघालूनिमद्रूपीं स्वरूपींनित्ययोजले ॥
भजतीआत्मभक्तीनें तेथोरमजसंमत ॥

## आर्या २

ठेवुनिमजवरिमनजे परमश्रद्धाधरोनिहेअन्य ॥
मातेंउपासितीजे तेमजलायुक्ततममहामान्य ॥

## दोहरा २

जोमोमेंमनराखिकें सेवतसेवकभाय ॥
बहुश्रद्धासोंजुगतसों सबतेअधिकाय ॥

## ओवी २

माझेठायींमननेमून ॥ श्रद्धापूर्वककरीभजन ॥
तोभक्तमजपावेजाण ॥ निश्चयेशीं ॥

## अभंग २

बोलेभगवानदासा ॥ निजमानसामद्रूपीं ॥ १ ॥
योजुनियांस्वरूपींमन ॥ हेंसाधननित्याचें ॥ २ ॥
आत्मभक्तीनेंभजती ॥ जयांचित्तींतेथोर ॥ ३ ॥
मजसंमतपांडवा ॥ तुकाबरवावाटतो ॥ ४ ॥

## श्लोक ३

येत्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तंपर्युपासते॥
सर्वत्रगमचिंत्यंचकूटस्थमचलंध्रुवम्॥

## समश्लोकी ३

क्षरेनाबोलवेनात्या अव्यक्ताचउपासिती॥
अचिंत्यसर्वत्रलिप्त नजेंअढळशाश्वत॥

## आर्या ३

अव्यक्तध्रुवअक्षर सर्वगज्यानिर्गुणांतमननचळ॥
कूटस्थअनिर्देशहि उपासितीजेअचिंत्यअणिअचळ॥

## दोहरा ३

जोजाधवतअच्छरहि जोनहिप्रगटसरूप॥
व्याधीमायातेंपुरे अजरअचिंत्यअरूप॥

## ओवी ३

जेंअक्षरअनिर्वाच्यअव्यक्तजाण॥ तेंसर्वत्रव्यापकसंपूर्ण॥
अंतःकरणासनित्यअगोचरजाणोन॥ त्याचीउपासनाकरिती॥

## अभंग ३

नात्याबोलवेक्षरेना॥ उपासनाजरीत्याची॥ १॥
अव्यक्तीलागेचित्त॥ सर्वअलिप्तअचिंत्य॥ २॥
जेंअढळशाश्वत॥ श्रुतीसंमतजाणवी॥ ३॥
तुकातेथिचारहिवासी॥ गुरुदासींपावला॥ ४॥

## श्लोक ४

संनियम्यैंद्रियग्रामंसर्वत्रसमबुद्धयः॥
तेप्राप्नुवंतिमामेवसर्वभूतहितेरताः॥

## समश्लोकी ४

आटोपुनीइंद्रियांतें सर्वत्रसमबुद्धिजे ॥
मातेंचिपावतीतेही सर्वभूतहितींरत ॥

## आर्या ४

सर्वत्रतुल्यदृष्टी इंद्रियगतिचेंकरोनियांदमन ॥
सर्वप्राणिहितींजे तत्परपावतिमलाचतेअमन ॥

## दोहरा ४

सबिंद्रियनकोंरोकिकें सबकोंलखतसमान ॥
सबजीवनकोंहितकरत मोंहिलखेयहिग्यान ॥

## ओवी ४

इंद्रियसमूहनेमून ॥ सर्वांठायींबुद्धीसमानधरून ॥
सर्वहितींतत्परहोऊन ॥ तेमजपावतीगाअर्जुना ॥

## अभंग ४

इंद्रियांतेंआटोपुन ॥ स्वात्मज्ञानीचोखजो ॥ १ ॥
समबुद्धीनेंसर्वत्र ॥ नेणेंक्षुद्रउत्तम ॥ २ ॥
जेहोमातेंचपावती ॥ क्रियाशक्तीसहित ॥ ३ ॥
तुकाजेसासर्वांभूतीं ॥ रतहितींनिर्मळ ॥ ४ ॥

## श्लोक ५

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥
अव्यक्ताहिगतिर्दुःखंदेहवद्भिरवाप्यते ॥

## समश्लोकी ५

कष्टीअधिकतेहोती अव्यक्तींचित्तयोजितां ॥
अव्यक्तगतितेंदेही दुःखेंपावतियास्तव ॥

## आर्या ५

अव्यक्तसक्तमनजे होतातिक्लेशत्यांचियादेही ॥
अव्यक्तगतीतेंबा बहुताक्लेशेंचिपावतीदेही ॥

## दोहरा ५

तिन्हेंकष्टबहुहोतहे ब्रह्मीलगावेचीत ॥
रूपरेखाज्याकोंनही दुखकोंलहियतमीत ॥

## ओवी ५

कष्टेंकरूनअव्यक्तींमननेमिती ॥ त्यांसिक्लेशचिहोती ॥
अव्यक्ताचीगतीदुःखेंपावती ॥ देहवंतहे ॥

## अभंग ५

कष्टीहोतीतेअधिक ॥ तेमीएकसांगतों ॥ १ ॥
चित्तयोजितांअव्यक्तीं ॥ देहासक्तीमुकला ॥ २ ॥
देहींगतीतेअव्यक्त ॥ मनाअर्पूनीबुजत ॥ ३ ॥
तुकापावेनानादुःखें ॥ यास्तवतींखेंपावती ॥ ४ ॥

## श्लोक ६

येतुसर्वाणिकर्माणिमयिसंन्यस्यमत्पराः ॥
अनन्येनैवयोगेनमांध्यायंतउपासते ॥

## समश्लोकी ६

मातेंचिमानुनीथोर कर्मेंसर्वसमर्पिती ॥
तरीअद्वैतयोगेंची मातेंध्यातीउपासिती ॥

## आर्या ६

माझाठायींसर्वहि कर्मेंजेअर्पुनीहिमत्परते ॥
ध्यातीउपासितीमज अनन्यत्याचानयोगतोपरते ॥

## दोहरा ६

जोसबकरमनकरतहै अरपनमोकोंजान ॥
ध्यावतकेवलभगतिसों बहुउपासनग्यान ॥

## ओवी ६

सर्वकर्मेंमाझाठायीं ॥ अर्पितीजाणोनिमाझीसोई ॥
मजध्यातीअहर्निशीपाही ॥ माझेंध्यानसर्वदा ॥

## अभंग ६

मातेंमानुनीयांथोर ॥ सोडीघोरअन्यत्र ॥ १ ॥
समर्पितीसर्वकर्में ॥ विधीवर्मेंसूचक ॥ २ ॥
तरीअद्वैतयोगेंची ॥ बुद्धित्यांचीसोडीना ॥ ३ ॥
उपासितीध्यातीमातें ॥ तुकयाचित्तेंसमतोल ॥ ४ ॥

## श्लोक ७

तेषामहंसमुद्धर्तामृत्युसंसारसागरात् ॥
भवामिनचिरात्पार्थमय्यावेशितचेतसाम् ॥

## समश्लोकी ७

ऐसींचित्तेंमजमधें त्यांचामीभवसागरीं ॥
पार्थानलावितांवेळ होतोंकेवळतारक ॥

## आर्या ७

कुंतीतनयात्यांचा दुःखप्रदमृत्युयुक्तभवसिंधू ॥
अठवूनिउद्धरींमी नेटेंत्यालागिदीनजनबंधू ॥

## दोहरा ७

मृत्युसहितभवउदधी ताकोंकरतउधार ॥
मोमेंचितरारव्योउन नबहुभायनिरधार ॥ -

## ओवी ७

मीउद्धरीतयांसी ॥ भवसागरींपरियेसी ॥
चित्तमाझेठायींनेमिसी ॥ तारकत्यातेंहोतसे ॥

## अभंग ७

मजमधेंऐसेचित्तें ॥ झेंपावतेजेझाले ॥ १ ॥
भवसागरींत्यांचामी ॥ अंतर्यामीतारकू ॥ २ ॥
वेळनलावितांपार्था ॥ ऊर्ध्वपंथापाठवी ॥ ३ ॥
तारकहोतोंतुकयासम ॥ प्राचिनश्रमहारूनी ॥ ४ ॥

## श्लोक ८

मय्येवमनआधत्स्वमयिबुद्धिंनिवेशय॥
निवसिष्यसिमय्येवअतऊर्ध्वंनसंशयः॥

## समश्लोकी ८

यालागींमनमद्रूपीं स्वरूपींबुद्धिघालुनी ॥
मजमाजीचमगतूं प्रवेशसिनसंशय ॥

## आर्या ८

ठेवीमजवरिमनतें पार्थाबुद्धीसहीनदेपरतुं ॥
निःसंशयमजमाजी प्रवेशसीपांडवाअतःपरतूं ॥

## दोहरा ८

तातेंअर्जुनबुद्धिमन मोहिमेंतूंराख ॥
यउआगेंमोदेहमों बसहेतुअभिलाख ॥

## ओवी ८

योगबळेंकरूनी ॥ मनबुद्धिमाझेठायींअर्पूनी॥
सुखीहोसीलमनमिळणीं ॥ यांतसंशयनसेकीं ॥

## अभंग ८

मनमद्रूपीयालागीं ॥ असलागीअसावें ॥ १॥
मलाबुद्धींततूंघाली ॥ ह्यातारवालींअक्षर ॥ २ ॥
मगतूंमजमाजीचरे ॥ चराचरेंविरहीतू ॥ ३ ॥
प्रवेशसीनासंशय ॥ गवसेसोयतुकयाची ॥ ४ ॥

## श्लोक ९

अथचित्तंसमाधातुंनशक्नोषिमयिस्थिरम् ॥
अभ्यासयोगेनततोमामिच्छाप्तुंधनंजय ॥

## समश्लोकी ९

आतांचित्तस्थिरकरूं शकेनासिमदंतरीं ॥
अभ्यासेंप्राप्तिचीमाझ्या इच्छाकरिधनंजया ॥

## आर्या ९

जरिशक्यनहोयतुला मजमाजीअचळमनसमाधानें ॥
तरितूंमजपावाया इच्छीअभ्यासयोगसंधानें ॥

## दोहरा ९

जोतूंमोमेंनहिसके चित्तअपनोहराय ॥
करीअभ्यासमोमिलनकों मोंहिनिरंतरध्याय ॥

## ओवी ९

तुझियाचित्तानयेस्थिरपण ॥ अभ्यासकरीआपण ॥
योगाभ्यासेंकरून ॥ पावसीधनंजया ॥

## अभंग ९

स्थिरकरूंचित्तआतां ॥ अभ्यासितांयेईना ॥ १ ॥
मदंतरींनाप्रवेश ॥ तदुद्देशेंसांगतों ॥ २ ॥

अभ्यासमत्प्राप्तीचा ॥ सव्यसाचीकरिइच्छा ॥ ३ ॥
धनंजयासहजेंमग ॥ लागेलागतुकयाचा ॥ ४ ॥

श्लोक १०

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसिमत्कर्मपरमोभव ॥
मदर्थमपिकर्माणिकुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥

समश्लोकी १०

अभ्यासहीनकरवे करीकर्ममदर्पण ॥
मत्कर्मेंकरितांज्ञानी तूंत्यास्थितिसपावसी॥

आर्या १०

अभ्यासनहोयजरी तरिमत्प्रीत्यर्थविहितकर्मकरी ॥
करितांमदर्थकर्में पावसितूंसिद्धिआत्मसौख्यकरी ॥

दोहरा १०

जोअभ्यासनहिकरुसके करमसमर्पणमोहि ॥
मेरेकरमनकरतहै सिद्धहोयगीतोयि ॥

ओवी १०

अभ्यासहीजरीनकरवे ॥ तरीकर्ममजसमर्पावें ॥
कर्मकरितांभावें ॥ इच्छिलीसिद्धीपावसी ॥

अभंग १०

नकरवेअभ्यासही ॥ ऐसीकांहींअडचण ॥ १ ॥
मदर्पणकरीकर्में ॥ होकावर्मेंभलतैसीं ॥ २ ॥
ज्ञानीमत्कर्मेंकरित ॥ प्राक्संचिताजाळित ॥ ३ ॥
तूंयास्थितिसीपावसी ॥ जेतुक्यासीसुलभगती ॥ ४ ॥

श्लोक ११

अथैतदप्यशक्तोऽसिकर्त्तुंमद्योगमाश्रितः ॥

सर्वकर्मफलत्यागंततःकुरुयतात्मवान्॥

समश्लोकी ११

हेंहीनव्हेतरिमन जिंकीहोयमदाश्रित॥
सर्वकर्मफळेंटाकी फळशब्देंसुखस्पृहा ॥

आर्या ११

हेंहीजरितुजनोहे तरिकरिमाझाचिआश्रयस्वच्छ ॥
जिंकुनिमनहेंपार्था टाकावेंसर्वकर्मफळतुच्छ ॥

दोहरा ११

यहजूतूंनहीकरिसके मोंसरनअनुराग ॥
सबकेकरमकेफलनकों अर्जुनदेतूंत्याग ॥

ओवी ११

कर्महीजरीनकरवे ॥ तरीमाझेपार्थारिघावें ॥
कर्मफळटाकावें ॥ सुखस्पृहा ॥

अभंग ११

हेंहीनव्हेमनतरी ॥ स्वाधिनकरीपुरतें ॥ १ ॥
मदाश्रितसख्याहोरे ॥ मगमोहरेगतलाभु ॥ २ ॥
त्यागीफळेंसर्वकर्मी ॥ नित्यधर्मीवासना ॥ ३ ॥
फळशब्देंसुखस्पृहा ॥ करीतुकाआपुला ॥ ४ ॥

श्लोक १२

श्रेयोहिज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानंविशिष्यते॥
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम्॥

समश्लोकी १२

अभ्यासाहूनिविश्वाल ज्ञानतेंध्यानत्याहुनी ॥
श्रेयकर्मसुखत्याग ममभुक्तिजितामग ॥

## आर्या १२

ज्ञानहिअभ्यासाहुनि शुभकरतेंध्यानत्याहुनीहिपर ॥
त्याहुनिकर्मफळाचा त्यागत्यागेंचिशांतियाउपर ॥

## दोहरा १२

ग्यानभलोअभ्यासतें तासोंध्यानविशेख ॥
फलत्यागतातेंभलो तातेशांतिहिलेख ॥

## ओवी १२

अभ्यासाहूनिज्ञानश्रेष्ठ ॥ ज्ञानाहूनिध्यानवरिष्ठ ॥
ध्यानाहूनित्यागवरिष्ठ ॥ तोजीवन्मुक्तकीं ॥

## अभंग १२

अभ्यासाहूनिविश्वाला ॥ सच्चिदात्मावोळखे ॥ १ ॥
तैंगाज्ञानध्यानत्याला ॥ विशेषालास्तजीतें ॥ २ ॥
श्रेयकर्मसुखत्याग ॥ पावेलागआमुचा ॥ ३ ॥
तुकाह्मणेजीवन्मुक्त ॥ हरिभक्तचांगले ॥ ४ ॥

## श्लोक १३

अद्वेष्टासर्वभूतानांमैत्रःकरुणएवच ॥
निर्ममोनिरहंकारःसमदुःखसुखःक्षमी ॥

## समश्लोकी १३

नकरीसर्वभूतांचा द्वेषमैत्रदयाळुजो ॥
मीमाझेनजयादुःख सुखतुल्यक्षमाजया ॥

## आर्या १३

मैत्रक्षमीसदयही सर्वांभूतींसदैवअद्वेष्टा ॥
निर्ममनिरहंकारी ज्याचीदुःखींसुखींहिसमचेष्टा ॥

## दोहरा १३

द्वेसनकाहुसोकरे मित्रभावकरीजान॥
अहंकारममतातजे सुखदुखजाहिसमान॥

## ओवी १३

सर्वभूतींद्वेषनाहीं॥ मैत्रीदयाळुपाही॥
सुखदुःखतेंही॥ समसमानमानीतसे॥

## अभंग १३

मूत्रचाळकूपरेशू॥ जाणेसर्वात्माविशेषू॥
त्याचिलागीनुठीद्वेषू॥ पैंगातोचीनिर्वैर॥ १॥
जीवनरंगाचसारिखें॥ होयतेवींजोहरीखे॥
करुणामैत्रतेवींदखे॥ भूतभावीदयेला॥ २॥
मीपणगेलेंगाजयाचें॥ तेथंमाझेंऐसेवाचे॥
नासिवेतोदुःखाचें॥ खतकथींउकलीना॥ ३॥
तुकावंदीसदाज्याला॥ क्षमाधरेसत्यत्याला॥
कष्टीदेखेजोसुखाला॥ अनुपमसाधुतो॥ ४॥

## श्लोक १४

संतुष्टःसततंयोगीयतात्मादृढनिश्चयः॥
मय्यर्पितमनोबुद्धिर्योमद्भक्तःसमेप्रियः॥

## समश्लोकी ४

संतुष्टसर्वदायोगी स्थिरचित्तदृढव्रत॥
मजमाजिमनोबुद्धि असामद्भक्तमत्प्रिय॥

## आर्या १४

संततयोगकरीजो मनोजयानेंसदैवसंतुष्ट॥
अर्पीमनबुद्धिमला दृढनिश्चयभक्तजोमलाइष्ट॥

## दोहरा १४

सदारहेसंतोखसों मनराखेनिजहात ॥
प्राणबुद्धिमोमेधरे बहुप्यारोमोंसात ॥

## ओवी १४

योगीतृप्तसुखेंसी ॥ स्थिरकरूनिमनासी ॥
मजमाजिमनबुद्धिअर्पीनेमेंसी ॥ तोचिभक्तममप्रिय ॥

## अभंग १४

धालेंमनतोचितृप्त ॥ योगमार्गींतचालत ॥
सर्वदाहीअखंडित ॥ जनाहितनिवेदी ॥ १ ॥
नायकर्तातोक्षोभेना ॥ उपरोधेंदुखविना ॥
स्थिरचित्ताचीवासना ॥ दृढव्रतयानाव ॥ २ ॥
मनबुद्धीसकालवी ॥ दोघांबांधूनपालवी ॥
जोकांआलाआमुचेगांवीं ॥ विढापाउडवाहाया ॥ ३ ॥
तुकाविनवितोतया ॥ माझादासल्लणोनियां ॥
प्रियत्यागेंत्यासुप्रियां ॥ मीगाप्रेमेंआलिंगीं ॥ ४ ॥

## श्लोक १५

यस्मान्नोद्विजतेलोकोलोकान्नोद्विजतेचयः ॥
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तोयःसचमेप्रियः ॥

## समश्लोकी १५

नज्यास्लवभितीलोक लोकांपासूनिजोनभी ॥
हर्षक्रोधत्रासचिंता नसेतोहीमजप्रिय ॥

## आर्या १५

भीतीलोकनज्याला लोकांभीतोनजोमलाभजतो ॥
हर्षक्रोधभयअणी उद्वेगेंमुक्तआवडेमजतो ॥

## दोहरा १५

भयेकाहुतेंनउरेंभय काहुतेंनहिंदेत ॥
हरखक्रोधदोउतजे सोमोकोंहरिलेत ॥

## ओवी १५

ज्यापासूनिलोकनव्हतिदुःखी ॥ लोकांपासावआपणअसेसुखी ॥
हर्षक्रोधभयउद्वेगनघेविशेषीं ॥ तोचिभक्तमजप्रिय ॥

## अभंग १५

बुबुळेंभ्रमतांचक्षाळी ॥ वातेंअंदोळुकमळी ॥
नक्षोभवीभूतावळी ॥ ऐसेंज्याचेंवागणें ॥ १ ॥
तोहीलोकापासूनियां ॥ त्रासनेघेगुरुराया ॥
जीवजेवींपाळीकाया ॥ ऐसासदासंरक्षी ॥ २ ॥
हर्षक्रोधदोन्हीनाहीं ॥ त्रासनघेतपदेही ॥
सुलक्षणुऐसामही ॥ वरीमाझाआवडता ॥ ३ ॥
तुकावंदीत्याचेंपद ॥ उणेंवर्णीज्यागोविंद ॥
जनामाजीत्याआनंद ॥ विजनींहीत्याहोनी ॥ ४ ॥

## श्लोक १६

**अनपेक्षःशुचिर्दक्षउदासीनोगतव्यथः ॥**
**सर्वारंभपरित्यागीयोमद्भक्तःसमेप्रियः ॥**

## समश्लोकी १६

निस्पृहीशुद्धजोदक्ष उदासीनमनींव्यथा ॥
आरंभसर्वहीटाकी आणिमद्भक्ततोप्रिय ॥

## आर्या १६

जोशुचिदक्षगतव्यथ निस्पृहजोपूर्णसुगुणराशीन ॥
सर्वोद्योगत्यागी तोप्रियमजभक्तअतिउदासीन ॥

## दोहरा १६

चाहकाहुकीनकरे रहेपुनीतउदास ॥
सबआरंभकोंतजे रहेसोमेरेपास ॥

## ओवी १६

जयाअपेक्षानसेकांहीं ॥ सदाशुचीदक्षपाहीं॥
कर्मारंभटाकूनही ॥ असेतोमद्भक्तप्रिय ॥

## अभंग १६

लोकपूजनींनागुंते ॥ शुद्धवासनाच्याहितें ॥
शाहणावागवीलोकातें ॥ हेदक्षताचोखट ॥ १ ॥
गृहदारासुतसुता ॥ उदासीनुभाग्ययेतां ॥
व्यथानमानीजोचित्ता ॥ भावगतींकदर्यु ॥ २ ॥
करीनकामफळपावों ॥ ऐसानधरीचलाहो ॥
आरंभाससरीपावो ॥ जान्हवीचाकापडी ॥ ३ ॥
असामद्भक्ततोप्रीय ॥ नाहींयाविषयींसंशय ॥
तुकानिजानंदेंगाय ॥ तेथेंकानमींदेतों ॥ ४ ॥

## श्लोक १७

योनहृष्यतिनद्वेष्टिनशोचतिनकांक्षति ॥
शुभाशुभपरित्यागीभक्तिमान्यःसमेप्रियः ॥

## समश्लोकी १७

नहर्षेनकरीद्वेष वांछाशोकनजोकरी ॥
टाकीशुभाशुभेंआणी भक्तमत्प्रियतोनर ॥

## आर्या १७

हर्षद्वेषनसेज्या नकरीशोकस्पृहामहाघोर ॥
टाकीशुभांशुभाजो प्रियमजलाभक्तियुक्ततोथोर ॥

## दोहरा १७

पियपायेआनंदही अप्रियलहेनदेख ॥
सोंचकाछकाहुकिनकरत नहिशुभअशुभविशेख ॥

## ओवी १७

नाहींहर्षनाद्वेषशोक ॥ नकरीकांक्षेचेंसुख ॥
शुभअशुभत्यागीदेख ॥ तोभक्तमजप्रिय ॥

## अभंग १७

हर्षद्वेषांविरहीत ॥ वांछाशोकनधरीत ॥
टाकीपाउलेंशुभांत ॥ अशुभांतत्यातुल्य ॥ १ ॥
आणिमद्भक्तमजला ॥ प्रियऐसागुणींझाला ॥
एकुलताएकआवडला ॥ वृद्धबंधेंबाळकु ॥ २ ॥
कामनास्तवभक्तिबारे ॥ कोट्यावधीकरणारे ॥
तुकानिष्कामसखारे ॥ जन्मोजन्मींदुर्लभ ॥ ३ ॥

## श्लोक १८

समःशत्रौचमित्रेचतथामानापमानयोः ॥
शीतोष्णसुखदुःखेषुसमःसंगविवर्जितः ॥

## समश्लोकी १८

शत्रुमित्रींसमतसा सन्मानींअपमानिंही ॥
शीतींउष्णींसुखींदुःखीं समधीरअसंगजो ॥

## आर्या १८

समशत्रुमित्रज्याला समानतैसाचिमानअपमानीं ॥
त्यागीजोसंगातें शीतोष्णींसौख्यदुःखसममानी ॥

## दोहरा १८

शत्रुमित्रनकोंसमलखे सबेमानअपमान ॥

शीतउष्णसुखदुखतजे संगकरेनहिआन ॥

## ओवी १८

जयाशत्रुमित्रसमानजाण ॥ नाहींमानआणिअपमान ॥
शीतउष्णसुखदुःखसमान ॥ जयाआसक्तानाहीं ॥

## अभंग १८

गाईचांगव्याघ्रखोटा ॥ नदीनेणेयाबोभाटा ॥
शत्रुमित्रातिसाहोंटा ॥ तर्हीशब्दुनालवे ॥ १ ॥
बाळपीडलेंपूजिलें ॥ कल्पनेणेंतैसेंझालें ॥
शीतउष्णेंउबगलें ॥ स्थळझाडनसोडी ॥ २ ॥
तेवींसुखदुःखांतरीं ॥ भजेसमानश्रीहरी ॥
समर्थांधीरपरउपकारी ॥ तुकाजैसानिःसंग ॥ ३॥

## श्लोक १९

तुल्यनिंदास्तुतिर्मौनीसंतुष्टोयेनकेनचित् ॥
अनिकेतःस्थिरमतिर्भक्तिमान्मेप्रियोनरः ॥

## समश्लोकी १९

मानीनिंदास्तुतीतुल्य तुष्टलाभेंजशातशा ॥
निराश्रयस्थिरमती आणिमद्भक्तताप्रिय ॥

## आर्या १९

निंदास्तुतितुल्यजया गेहत्यागोनिभक्तिलासजला ॥
संतुष्टयथालाभें मौनीस्थिरबुद्धितोरुचेमजला ॥

## दोहरा १९

स्तुतीनिंदाएकसीगमे गहेमानसंतोख॥
ओमरथिरमतीरहे बहेमोभगतीविशेख ॥

## ओंवी १९

स्तुतिनिंदासमानी ॥ आत्मलाभसंतोषदोन्हीं॥
निराश्रयस्थिरहोउनी ॥ जोराहेतोमाझाभक्त ॥

## अभंग १९

मौनीअर्वाचीकनेणे ॥ स्तुतिनिंदाकेलीकोणें ।
तुष्टलाभेंतोषघेणें ॥ जैसातैसासंतत ॥ १ ॥
निराश्रयभगवंतीं ॥ ज्ञानेंकेलीशुद्धमती॥
माझीभक्तीआचरती ॥ मार्गइतरांकळावया ॥ २ ॥
तोमत्प्रीयकितीवाणूं ॥ रुटिकेंनव्हेतूझीआणू ॥
तुकाह्मणेथोरपणू ॥ देवसांडीआपुलें ॥ ३ ॥

## श्लोक २०

येतुधर्म्यामृतमिदंयथोक्तंपर्युपासते॥
श्रद्दधानामत्परमाभक्तास्तेऽतीवमेप्रियाः॥

## समश्लोकी २०

बोलिल्याचपरीजेहें धर्म्यामृतउपासिती ॥
श्रद्धालुथोरमीज्यांला भक्ततेबहुमप्रिय ॥

## आर्या २०

पार्थाहेंधर्म्यामृत यथोक्तसद्भक्तयासजेभजती ॥
विश्वासूमत्परते प्रीतितयांचीअसेचमजबहुती ॥

## दोहरा २०

धरमअमृतजुकह्यो ताकोंसुसेवेकोय॥
श्रद्धाजुक्तमेरोभगत मोहिसोंप्यारोहोय ॥

## ओंवी २०

हेंधर्मामृत ॥ याचीउपासनाकरित ॥

तोजाणजीवन्मुक्त ॥ माझाभक्तपैं ॥

## अभंग २०

बोलिल्याचपरीजेहें ॥ धर्मामृतजाणूनहें ॥
उपासितीसर्वदाहे ॥ आत्मभक्ताचोखटी ॥ १ ॥
श्रद्धाळूमाझ्यामार्गी ॥ मीचथोरऐशालागीं ॥
भक्तिवांटीयाविभागी ॥ भक्तजेकांममप्रिय ॥ २ ॥
तेहीप्रीतकीतीसांगूं ॥ आतांअमूचाजिवलगू ॥
त्याचीकीर्तीवर्णीचांगू ॥ त्यासहीमीबोलतों ॥ ३ ॥
नाहींतरीगीताशास्त्र ॥ पुढेंजयाचेंवक्त्र ॥
अथवाऐकतीलश्रोत्र ॥ कायावाचामनोझें ॥ ४ ॥
तेमीप्रीतीच्यापडिभरें ॥ मुगुटीवाईजेआदरें ॥
जैसातुकास्वाधिकारें ॥ तैसामातेंतोप्रीय ॥ ५ ॥

इतिश्रीमद्भगवद्गीतायांयोगशास्त्रेश्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगोनामद्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

## वामन

इतिटीकासमश्लोकी अध्यायाद्वादशावरी ॥
श्रीपार्थसारथीकर्त्ता जोवामनमनोरथीं ॥

## अभंग

ऐसेंबोलिलेंअनंतें ॥ सांगेसंजयनृपातें ॥
तैसाजन्मेजयातें ॥ वैशंपायनबोधितु ॥ १ ॥
गीताभीष्मपर्वाआदीं ॥ कींहेमुक्तिचीगवादी ॥
किंवालडिवाळाखांदी ॥ वाहेसमर्थीलौकीकी ॥ २ ॥
येथेंअर्जुनाचाप्रश्न ॥ सगुणनिर्गुणउपासन ॥
त्यासीबोलिलाभगवान ॥ भक्तियोगनिर्मळ ॥ ३ ॥

आतांत्रयोदशपुढें ॥ देवोवर्णीलसदृढें ॥
जेथेंपार्थप्रश्नगाढे ॥ जडमूढातारक ॥ ४ ॥
तुकयासद्गुरुसंसर्गें ॥ द्वादशअध्यायमार्गें ॥
आलासमाप्तीसअंगें ॥ ऐकिलाचेएकावा ॥ ५ ॥
इतिगीतार्थबोधिन्यांश्रीमद्भगवद्गीताटीकायांद्वादशोऽध्यायः॥१२॥



# त्रयोदशाध्यायप्रारंभः

## वामन

सकलक्षेत्रक्षेत्रज्ञतत्त्वाय परमपुरुषाय श्रीवासुदेवाय नमः ॥ ॥ पूर्वाध्यायींवासुदेवें सगुणोपासनापर ॥ वर्णिलेंकींअनन्येंचि योगें तेभजतीमज ॥ १ ॥ संसारसागरींत्यांचा होतोंउद्धारणारमी ॥ अतित्वरकींमाझा त्यांसविश्वासयेरितीं ॥ २ ॥ अव्यक्तोपासकां माझा नसेविश्वासयास्तव ॥ तेकष्टतीभावऐसा नसेवैषम्यईश्वरीं ॥ ॥ ३ ॥ कल्पवृक्षासिजोजैसें मागेतैसेंचितोतया ॥ फळदेत्यांतवैषम्य नसेयेरितिईश्वरीं ॥ ४ ॥ अनन्ययोगेंचतरी जोमीसगुणत्याम ला ॥ भजतूंहीह्मणुनियां याभावेंहरिबोलिला ॥ ५ ॥ कींमद्रूपीं मनधरी मनसंकल्परूपतें ॥ रूपेंचरित्रेंहींमाझीं मनेंकरुनिआठवी ॥ ॥ ६ ॥ आणिमाझ्यास्वरूपींतूं निजबुद्धिप्रवेशवी ॥ बुद्धिशब्देंचित्त घ्यावें कींस्वरूपींहिजेंनिघे ॥ ७ ॥ माझेचिठायींमनतूं धरीबुद्धिप्रवे शवी ॥ याअर्थाचाभावऐसा कींभजेदोंपरीमज ॥ ८ ॥ सगुणाचें भजनतूं करिसीपरिनिर्गुणीं ॥ नथारेचित्ततरितूं अभ्यासकरिनिर्गु णीं ॥ ९ ॥ अभ्यासहीनकरवे तरिनिष्कामहोइतूं ॥ मदर्पणकरीतें ही नठाकेतुजजेधवां ॥ १० ॥ सर्वकर्मफलत्याग करीतूंचित्तनिग्र हें ॥ ह्मणिजेटाकितूंकर्में आणिकर्मफळासही ॥ ११ ॥ भावकीं सर्वहीधर्म टाकोनिसुखनिस्पृह ॥ होऊनियांभजमज जगदात्मत्व दृष्टिनें ॥ १२ ॥ कर्मसाध्यसुखेंतोच कर्मांचींबोलिलेफळें ॥ तस्मा त्कर्मफलत्यागें वासनात्यागसूचिला ॥ १३ ॥ स्वर्गादिकफलत्याग ह्मणावातरिकर्मंचि ॥ नकरीयासतींकैंची फळेंकींत्यागहाकरी ॥ ॥ १४ ॥ कर्मकरोनिकर्माचा फलत्यागोपदेशहा ॥ ह्मणावातरिहा

अर्थ पूर्वश्लोकींचबोलिला ॥ १५॥ कींअभ्यासनव्हेतेव्हां मत्कर्म परहोयतूं ॥ मत्कर्मह्मणिजेजेव्हां निष्कामत्वेंमदर्पित ॥१६॥ याश्लोकींबोलतोंकींतें नटाकेजरिअर्जुना ॥ सर्वकर्मफलत्याग करीहोऊनिआश्रित ॥ १७ ॥ यालागींत्यागकर्माचा येथेंबोलुनिहीपुन्हा ॥ फळाचात्यागबोलोनी वासनात्यागसूचिला ॥ १८ ॥ कर्मेंचटाकी ह्मणतां फलत्यागवदेलकां ॥ तस्मात्फलत्यागशब्दें वासनात्यागसूचिला ॥ १९ ॥ सर्वधर्मान्परित्यज्य मामेकंशरणंव्रज ॥ बोलेलऐसेंअंतींही अध्यायींअठराविया ॥ २० ॥ येथेंत्यागींफलत्यागें वासनात्यागसूचिला ॥ कींजोंहावासनाबद्ध तोंवरीविधिकिंकर ॥ ॥ २१ ॥ नित्यकर्मनयेटाकूं जोबाह्यसुखवासना ॥ कर्मत्यागफलत्याग दोन्हीयास्तवबोलिला ॥ २२ ॥ फळशब्देंजरिसुख सुखत्यागचिबोलिला ॥ ह्मणावेंतरिटाकावे सर्वभोगसुखप्रद ॥ २३ ॥ तेव्हांप्रारब्धकर्माचा क्षयभोगाविणेंनसे ॥ नबोलवेत्यागतोही वासनात्यागमात्रहा ॥ २४ ॥ नप्रार्थितांजसींदुःखें सुखेंहीप्राप्तयेरितीं मानूनिभोगइच्छीना वासनात्यागयेरितीं ॥ २५ ॥ तस्मात्कर्मफलत्याग ह्मणिजेकर्मआणिखी ॥ कर्माचेंफळजेंबाह्य सुखतद्वासनात्यजी ॥ २६ ॥ आतांमत्कर्मह्मणिजे एकादश्यादिकेंव्रतें ॥ तेंहीनटाकितीजेव्हां नित्यकर्मेंचितूंकरी ॥ २७ ॥ याभावेंबोलतोकृष्ण कीं तेंकर्मकरोनियां ॥ सर्वकर्मफलत्याग करीश्लोकार्थहाहरी ॥ २८॥ तेव्हांमत्कर्मह्मणतां स्वधर्मत्यागबोलिला ॥ तदभावींपुन्हात्याला स्वधर्मकरूंसांगतो ॥ २९ ॥ तरितेंकायकठिण हेंसोपेंकायत्याहुनी ॥ कींतेंनकरवेतेव्हां हेंकरूंसांगतोहरी ॥ ३० ॥ आणिमत्कर्म ह्मणतां नित्याचात्यागबोलिला ॥ ह्मणावींतरिजींनित्यें त्याचीचनव्हतीकशीं ॥ ३१ ॥ येमेमतमिदंनित्य मनुतिष्ठंतिमानवाः ॥ ऐसेंतृतीयअध्यायीं बोलिलाश्रीहरीचहा ॥ ३२ ॥ विष्णुव्रतेंचिकरणें

तेंमाझेंमतआणिखी ॥ नित्यकर्मनतेंमाझें मतहेंतोनबोलिला॥३३॥ तेव्हांमत्कर्मह्मणिजे निष्कामेंईश्वरार्पित ॥ यामध्येंआटलींसर्व कर्में विष्णुव्रतांसही॥३४॥ आतांजीलौकिकेंकर्में तत्फलत्यागबोलिला॥ ह्मणालतरिमत्कर्म ह्मणतांसर्वत्यागहे ॥ ३५॥ यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र लोकोयंकर्मबंधनः॥ ऐसेंतृतीयअध्यायीं केलानिर्णयमाधवें॥३६॥ कींयज्ञमीविष्णुमाझें कर्मयज्ञार्थकर्मतें ॥ त्यावेगळींसर्वकर्में बद्धकें ह्मणवूनियां ॥ ३७ ॥ तेव्हांमत्कर्मपरम होयतूंह्मणवूनिजें ॥ बोलिलात्यांतहीसर्व कर्मेंलौकिकआटलीं ॥ ३८ ॥ मत्कर्मह्मणिजे कर्में मदर्पणकरीअसा ॥ भावकींतेंचिअर्पीना तरीमत्कर्मतेंनव्हे ॥ ॥ ३९ ॥ त्यांतहीलौकिकेंकर्में ठेवोनिवदलाजरी ॥ कांहींबद्धकठेवूनीबोलिलानघडेअसें ॥ ४० ॥ उगातोत्यागनघडे ईश्वरींअर्पिल्याविणें ॥ विषभक्षूनिमरण त्यागीतरिमरेचितो ॥ ४१ ॥ वैद्याचियाकरीं दिल्हा बचनागकरीरस ॥ ईश्वरींअर्पिलींकर्में होतींमोक्षासकारण ॥ ४२ ॥ यालागिमत्कर्मपर होयतूंबोलिलाहरी ॥ लौकिकेंवैदिकेंविष्णु व्रतेंत्यांतचिआटलीं ॥ ४३ ॥ आतांतेंहीनकरवे मत्कर्मतरिअर्जुना ॥ सर्वकर्मफलत्याग करीतूंह्मणतोहरि ॥ ४४ ॥ कींकर्मेंसर्वहीटाकी आणिकर्मफळेंसुखें ॥ ह्मणिजेकर्मसाध्याची सुखाचीटाकिवासना ॥ ४५ ॥ तरीकर्माचियात्यागें प्रत्यवायाख्य बंधनें ॥ ज्यासतोवासनात्याग करीहीतरितोव्यथा ॥ ४६ ॥ ऐसेंह्मणालतरिहें आत्मज्ञाननसेतया ॥ अज्ञाजनाचीवार्ताही याप्रसंगांतनाढळे ॥ ४७ ॥ आत्मज्ञासहिजोंकांहीं वासनाशेषतोंवरी ॥ कर्मत्यागेंप्रत्यवाय वासनात्यागयास्तव ॥ ४८ ॥ मागेंतृतीयअध्यायीं कर्माचात्यागनिंदितां ॥ तेथेंअसंगजोज्ञानी तोकर्मातीतबोलिला ॥ ४९ ॥ यस्त्वात्मरतिरेवस्या दात्मतृप्तश्चमानवः ॥ आत्मन्येव चसंतुष्ट स्तस्यकार्यंनविद्यते ॥ ५० ॥ आत्मवींचूजयाप्रीती तृप्ति

संतोषत्यातची ॥ अनन्यत्रअसाज्ञानी त्यालाकर्तव्यतानसे ॥५१॥
सर्वधर्मान्परित्यज्य मामेकंशरणंव्रज ॥ ह्मणोनिअंतींगीतेच्या बो
लेलश्रीहरीअसें ॥ ५२ ॥ तोहीजेवासनात्यागी ज्ञानीत्यालाचि
तोविधी ॥ जोंवरीवासनायुक्त ज्ञानीहीविधिकिंकर ॥ ५३ ॥ अ
हंत्वासर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामिमाशुचः ॥ यावाक्येंतोनव्हेज्ञानी
ह्मणालतरिआइका ॥ ५४ ॥ पापापासूनिमीतूतें सोडवीनह्मणोनि
जें ॥ बोलिलापापशब्देंत्या संचितक्षयसूचिला ॥ ५५ ॥ पूर्वील
नासतीपापें पुढिल्यालिप्तहोइना ॥ ज्ञानझाल्यावरीऐसें ब्रह्मसूत्रीं
असेस्फुट ॥ ५६ ॥ ॥ ब्रह्मसूत्र ॥ ॥ तदधिगमेउत्तरपूर्वाघयो
रश्लेषविनाशौ ॥ पुण्यहीपापहीलोह शृंखलाहेमशृंखला ॥ ५७॥
दोन्हीहीबद्धकेंतस्मा त्पुण्यहीपापभावहा ॥ यालागींअर्जुनज्ञानी
कर्मत्यागह्मणूनियां ॥ ५८ ॥ शेवटींत्यासबोलेल येथेंहीबोलतो
असा ॥ ५८॥ ह्मणालत्यागकर्माचा बोलिलाजरिअर्जुना ॥ युद्धीं
कांमागुताकृष्णें योजिलातरिआइका ॥ ५९ ॥ स्वभावजेनकौंते
य निबद्धःस्वेनकर्मणा ॥ याश्लोकींयुद्धराज्यादि त्याचेंप्रारब्धसू
चिलें ॥ ६० ॥ प्रारब्धकर्मजेंत्याचा क्षयभोगेंचबोलिला ॥ याला
गींअर्जुनेंयुद्ध करोनीराज्यभोगिलें ॥ ६१ ॥ आतांआत्मज्ञहाजे
व्हां यालाहीपाइऱ्याअशा ॥ उंचनीचवदेकांहो ह्मणालतरिआइ
का ॥ ६२ ॥ आत्मत्वकळणेंमात्र नव्हेस्थितिसकारण ॥ तेंदेवगुरु
सेवेनें पूर्वाध्यायींनिरूपिलें ॥ ६३ ॥ आत्मैक्यभक्तिनेंदेवा भजे
आणीकनिर्गुणीं ॥मनयोजीअसायोगी शीघ्रसिद्धीसपावतो॥६४॥
बोलिलातेंचभगवान् कींभजेसगुणामज ॥ आणियोगेंअनन्येंचि
निर्गुणत्वेंभजेमज ॥ ६५ ॥ निर्गुणींचित्तथारेना तरीअभ्यासतूंक
री ॥ नव्हेअभ्यासतरितूं कर्मयोगचिआचर ॥ ६६ ॥ तेंहीनव्हेतरी
त्यागी कर्मआणिकवासना ॥ परीआश्रितहोत्सातां कर्माचात्याग

तूंकरी ॥ ६७ ॥ भावकीसत्यचैतन्य त्याचाधरुनिआश्रय ॥ टाकू
नीवासनातेव्हां कर्मांचात्यागतूंकरी ॥ ६८ ॥ ह्मणसीनिर्गुणात्मतो
नधारेचित्तजैंधवा ॥ होऊंकसाआश्रितमी तोंवरीत्यागहीकथा ॥
॥ ६९ ॥ तरीमीनवमाध्यायीं बोलिलोंतुजलागिकीं ॥ प्रत्यक्षा
वगमंधर्म्यं सुसुखंकर्तुमव्ययम् ॥ ७० ॥ कींप्रत्यक्षीअनुभवा ये
आणिसुखसाध्यही ॥ तेंतूंविश्वात्मकध्यान करीमाझेंधनंजया ॥
॥ ७१ ॥ पटींनतूंघटींमाती जशीचैतन्ययेरितीं ॥ तयासह्मणणें
ज्ञान तेंअभ्यासाहुनीबरें ॥ ७२ ॥ समजोनिअसेंत्याचें ध्यानतें
त्याहुनीबरें ॥ तेव्हांहात्यागकर्माचा ह्मणुनीबोलिलाहरी ॥ ७३ ॥
श्रेयोहिज्ञानमभ्यासात् ज्ञानाद्ध्यानंविशिष्यते ॥ ध्यानात्कर्मफ
लत्याग स्त्यागाच्छांतिरनंतरं ॥ ७४ ॥ अभ्यासाहूनिविश्वात्म ज्ञा
नतेंध्यानत्याहुनी ॥ श्रेयकर्मफलत्याग ममुक्तिजितांमग ॥ ७५॥
याश्लोकाचीसमश्लोकी टीकाहीयेचरीतिची ॥ पूर्वाध्यायींबोलि
येली परिभावार्थयेरितीं ॥ ७६ ॥ कींबोलिलोंजोअभ्यास त्या
हुनीज्ञानहेंबरें ॥ वृत्तीनिरोधणेंकष्ट त्याहुनीसुखसाध्यहें ॥ ७७ ॥
ज्ञानशब्देंजडत्यागें सर्वचैतन्यजाणणें ॥ त्याचेंध्यानघडेतेव्हां कर्म
त्यागासियोग्यता ॥ ७८ ॥ आत्मासमजणेंहेंचि ज्ञानऐसेंप्रसिद्ध
हें ॥ हाअर्थतेधवांहोता कींअभ्यासनबोलता ॥ ७९ ॥ आत्मा
आधींसमजला तेव्हांअभ्यासमांडिला ॥ त्याहूनिआत्माकळणें
श्रेयहेंबोलणेनव्हे ॥ ८० ॥ ज्ञानशब्देंतरिजड जगचैतन्यपाहणें ॥
हाअर्थकशावरुनी ह्मणालतरिआइका ॥ ८१ ॥ मार्गेचतुर्थाध्या
यांत बोलिलाअर्जुनाप्रति ॥ तद्विद्धिप्रणिपातेन इत्यादिश्लोकहो
नहे ॥ ८२ ॥ बोलिलापहिलेश्लोकीं गुरूपसदनकर्मे ॥ कींतेगुरुतु
तेंपार्था हेंज्ञानउपदेशिती ॥ ८३ ॥ तेंज्ञानकैसेंह्मणशी तरीमीसां
गतोंखुण ॥ कींय्याज्ञानेंआपणांत भूतेंनिःशेषदेखसी ॥ ८४ ॥ ऐ

सेंदुसरियाश्लोकीं बोलिलायाचकारणें ॥ ज्ञानकीर्तिआलयांत जडाभूतांसिपाहणें ॥ ८५ ॥ अनादिपरिभाषाही कींजेंनिर्गुणकेव ळ ॥ तेथेंनिरोधवृत्तीचा योगत्यालागिबोलिजे ॥ ८६ ॥ जडचैत न्यएकत्वें हेमालंकारऐक्यवत् ॥ ऐसेंजेंपाहणेंत्यास महर्षीज्ञानबो लती ॥ ८७ ॥ दोंश्लोकींयोगवासिष्ठीं वसिष्ठहिअसेरितीं ॥ बोलि लाज्ञानशब्दाचा तेथेंहीअर्थयेरितीं ॥ ८८ ॥ योगवासिष्ठश्लोक ॥ द्वौक्रमौचित्तनाशाय योगोज्ञानंचराघव ॥ योगोवृत्तिनिरोधोहि ज्ञानंसम्यगवेक्षणं ॥ ८९ ॥ असाध्यःकस्यचियोगो ज्ञानंकस्यचि देवच ॥ प्रकारौद्वौततःसाक्षा ज्जगादपरमःशिवः ॥ ९० ॥ प्रसिद्ध योगवासिष्ठीं हेदोन्हीश्लोकअर्थही ॥ हरियेथेंचबोलेल पाहावें सज्जनींबरा ॥ ९१ ॥ हेदोनीचित्तनाशाया योगकींज्ञानराघवा ॥ निरोधवृत्तिचायोग ज्ञानसम्यङ्निरीक्षण ॥ ९२ ॥ असाध्ययोग कोणासी ज्ञानकोणासिदुर्घट ॥ ह्मणोनिदोनिप्रकार बोलिलाहे सदाशिव ॥९३॥ अर्थभावार्थहीहाची त्यांतसम्यङ्निरीक्षण ॥ ह्म णिजेतंतुदृष्टीनें बरेंअंबरपाहणें ॥ ९४ ॥ दिसेघटअसेमाती ऐसेंस म्यङ्निरीक्षण ॥ दिसेविश्वअसेब्रह्म हेदृष्टीज्ञानसंज्ञित ॥ ९५ ॥ येरितींरघुनाथासी वसिष्ठगुरुबोलिला ॥ कृष्णहीअर्जुनालागी बो लतोयेचरीतिनें ॥ ९६ ॥ कींवृत्तिच्यानिरोधाचा जरियोगअसा ध्यहा ॥ अभ्यासापरिसज्ञान बरेंसम्यङ्निरीक्षण ॥ ९७ ॥ धरो निस्मृतिमातीची जेंघटादिकपाहणें ॥ चैतन्यस्मृतिनेंविश्व पाहणें सम्यगीक्षण ॥ ९८ ॥ तंतुविस्मरणेंविश्व झणींमागुतिपाहसी ॥ यालागिहेंध्यानकरी ध्यानज्ञानाहुनीबरें ॥ ९९ ॥ पटींतंतुतसा आत्मा ध्यायीतूंसचराचरीं ॥ तेव्हांहाउचितत्याग कर्माचाह्मणवू नियां ॥ १०० ॥ ध्यानात्कर्मफलत्याग याभावार्थेंचिबोलिला ॥ यात्यागावरिजेशांती तोजीवन्मुक्तबोलिला ॥ १०१ ॥ याभावें

बोलिलाकृष्ण त्यागाच्छांतिरनंतरं ॥ कींयाध्यानेंअसात्याग जी वन्मुक्तसवेंचितो ॥ २ ॥ बोलिलागूढभावेंजें हेंचिस्पष्टत्रयोदशीं॥ बोलेलयेथेंभवान् क्षेत्रक्षेत्रज्ञतत्त्वही ॥ ३ ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानंमतंमम ॥ याश्लोकींस्पष्टबोलेल तत्त्वजें जगदात्मक ॥ ॥ ४ ॥ क्षेत्रहेंजडह्मादेह क्षेत्रज्ञक्षेत्रजाणता ॥ दोहींतजेंज्ञानत्या चें ज्ञानतेंमजसंमत ॥ ५ ॥ ऐसेंबोलेलयामाजी क्षेत्रज्ञीज्ञानदी सतें ॥ क्षेत्रींजडींज्ञानकैंचें ह्मणूनिभ्रमतीजन ॥ ६ ॥ अर्थयाचा नकळतां वाखाणितियथारुचि ॥ परीतंतूवीणपट नसेऐसेंनपाहती ॥ ७ ॥ घटींमातीदिसेतेसें चैतन्यदिसतेंजगीं ॥ हीकृपेचीकिल्लि ज्यांला ठाउकीतेचिजाणती ॥ ८ ॥ एवंयादुसऱ्याश्लोकीं पूर्वा ध्यायांतजेंहरी॥ विश्वात्मताज्ञानशब्दें बोलिलातेंचिवर्णिल ॥ ९ ॥ पूर्वाध्यायींनिर्गुणींजो योगाभ्यासतयाह्मनी ॥श्रेयविश्वात्मकज्ञान त्याहूनिध्यानबोलिला ॥ ११० ॥ तरीआत्माचकळला मगविश्व तदात्मक ॥ कळलेंचिदुजेंत्याचें कळणेंज्ञानतेंकसें ॥ ११ ॥ ह्मणी ऐसीअर्जुनाला शंकाहोयह्मणूनियां ॥ एकब्रह्मद्विधाज्ञेय याअ ध्यायींनिरूपिलें ॥ १२ ॥ ह्मणेलसांगतोंज्ञेय ज्याज्ञानेंमुक्तिपा वसी ॥ ऐसेंबारावियाश्लोकीं बोलोनिज्ञेयवर्णिलें ॥ १३ ॥ त्यां तबाराविया श्लोकीं उत्तरार्धेकरूनियां ॥ व्यतिरेकेंतत्त्वशुद्ध सांगेल ज्ञेयकेवळ ॥ १४ ॥ अनादिमत्परंब्रह्म नसत्तन्नासदुच्यते ॥ याअ र्थेकरुनीतत्त्व व्यतिरेकेंचवर्णिल ॥ १५ ॥ दावूनिवेगळीमाती मगसर्वघटांततें ॥ दाविजेयेरिनींब्रह्म दावीलसचराचरीं ॥ १६ ॥ सर्वतःपाणिपादंतत् इत्यादिमगअन्वयें ॥ श्लोकींत्रयोदशींतत्त्व सां गेलजगदात्मक ॥ १७ ॥ तेराविवाचअध्यायीं श्लोकातेराविया मधें ॥ बोलेलअन्वयेंकृष्ण ज्ञेयतेंबहुदुर्लभ ॥ १८ ॥ ज्ञाताहीसप्त माध्यायीं बोलियेलाअलभ्यकीं ॥ वासुदेवःसर्वमिति समहात्मासु

दुर्लभः ॥ ११ ॥ जडाच्यान्यतिरेकेंजें शुद्धतेंबहुजाणती ॥ नसेसत् नअसत्ऐसें ज्ञेयजेंयेथवर्णिल ॥ १२० ॥ कींविवर्तपणेंविश्व असे ब्रह्मह्मणूनियां ॥ दृष्टांतबोलतीयाचा तत्त्वानुभवनेणती ॥ २१ ॥ परंतुअन्वयेंसर्व पाहणेंब्रह्मदुर्लभ ॥ सर्वतःपाणिपादंतत् ऐसेंजेंयेथ वर्णिल ॥ २२ ॥ कींरज्जुदृष्टिसदिसे आधींसर्पदिसेमग ॥ मातीआ धींदिसेदृष्टीं तेव्हांकेंचान्मृषाघट ॥ २३ ॥ जयाअनुभवेंसर्व वासु देवचिपाहती ॥ तेभागवततेज्ञानी तेजीवन्मुक्तदुर्लभ ॥ २४ ॥ आ धींदृष्टीदिसेसोनें पाहतांमगभूषण ॥ तेंचिसोनेंदिसेजैसा विश्वद्रष्टा हरीचतो ॥ २५ ॥ दिसोनिहारपेविश्व ब्रह्मींहेमींजसानग ॥ ऐसा अनुभवीलोकीं दुर्लभाहोनिदुर्लभ ॥ २६ ॥ याचीकिल्लीगुरुमुखें कळलीपाहिजेपृथक् ॥ ज्ञेयद्विविधयालागीं याअध्यायींनिरूपिल ॥ २७ ॥ श्रेयोहिज्ञानमभ्यासात् ह्मणोनिवदलाहरी ॥ पूर्वाध्यायीं याचिभावें कींहीज्ञानकळापृथक् ॥ २८ ॥ ज्ञानहोउनिहीकोणी विश्वाधिष्ठानविस्मृती ॥ करुनीपाहतीविश्व तंतुविस्मरणेंपट ॥२९॥ यालागींपूर्वअध्यायीं ज्ञानाद्ध्यानंविशिष्यते ॥ ह्मणोनिबोलिला कृष्ण कींध्यानश्रेयत्याहुनी ॥ १३० ॥ ध्यानतेंहेंचकींपाहे वासुदे वींचराचर ॥ चराचरींवासुदेव आत्माआपणयेरितीं ॥ ३१ ॥ ऐसें ध्यानजयासाधे तोयोगभ्रष्टहोयिना ॥ मुक्तीत्यालायाचजन्मीं याचदेहींनसंशय ॥ ३२ ॥ आरंभींनवमाध्यायीं संगतिश्लोकत्या मधें ॥ प्रसंगेंयाप्रसंगातें ॥ श्रुतिस्मृत्युक्तवर्णिलें ॥ ३३ ॥ तस्माद्वि श्वात्मकध्यान जीवन्मुक्तिसकारण ॥ परंतुआधींविश्वात्म ज्ञानहो इलतेधवां ॥ ३४॥ श्रेयोहिज्ञानमभ्यासात् ह्मणोनीबोलिलाहरी ॥ पूर्वाध्यायींद्विधाज्ञेय याअध्यायांतयास्तव ॥ ३५ ॥ आणीक स्पष्टबोलेल पूर्वाध्यायोक्तयास्थळीं ॥ कींजैसेंकार्यतेंरीती करावें ध्यानवस्तुचें ॥ ३६ ॥ पूर्वाध्यायींबोलिलाकीं मयिबुद्धिनिवेशय॥

ध्यानेनात्मनिपश्यंति ऐसेंतेंयेथवर्णिल ॥ ३७ ॥ मदर्थकर्मकेल्या
ही ज्ञानस्थितिसपावसी ॥ह्मणूनिबोलिलापूर्वी तेंहियेथेंनिरूपिलें॥
॥ ३८ ॥ येथेंबोलेल्हरिकीं कर्मयोगेनचापरे ॥ ह्मणिजेकर्मयोगें
ही पाहतीआत्मवस्तुतें ॥ ३९ ॥ विश्वात्मध्यानजेंपूर्वी ज्ञानोत्तर
निरूपिलें ॥ अन्येसांख्येनयोगेन ह्मणूनीयेथवर्णिल ॥ १४० ॥ वे
दोक्तसांख्यतेंहेंकीं तत्त्वसंख्याकरोनियां ॥ चैतन्यजडतत्त्वांत पाहे
तंतूपटींजसा ॥ ४१ ॥ नेणूनियांयाप्रकारें अध्यायद्वयसंगती ॥
अर्जुनप्रश्नआरंभीं कोणीकल्पितवाचिती ॥ ४२ ॥ सातांशतांवेग
ळातो श्लोकअध्यायतेथुनी ॥ इदंशरीरंकौंतेय येथूनभगवान्व
दे ॥ ४३ ॥ तेथूनिचसमश्लोकी टीकाहीकरितोहरी ॥ आतांमा
गीलजेश्लोक संगतिश्लोकहेपृथक् ॥१४४॥ ॥ अभंग ॥ ॥ पूर्व
प्रसंगीऐकिलें भक्तिसाकल्यवर्णिलें ॥ तेणेंआशंकाघेतले ह्मणोनि
प्रश्नहेसाहा ॥ १ ॥ देहामाजिललिंगाडें निवारुनीयानीवाडें ॥ उ
घडशुद्धतासांपडे ऐसेंकांहींकल्पीतूं ॥ २ ॥ अहोतोदाटुगापार्थिव॥
दांडाइतत्याचाठेव ॥ यास्तवपुसेवासुदेव वशझालाजाणून ॥३॥ ते
थेंतुकयाचेसंगती कांहींप्रसादपंगती ॥ लाभेऐसीकेलीयुक्ती नका
घेऊंकंटाळा ॥ ४ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ अर्जुनउवाच ॥ ॥ प्रकृतिपु
रुषंचैवक्षेत्रंक्षेत्रज्ञमेवच एतद्वेदितुमिच्छामिज्ञानंज्ञेयंचकेशव ॥ दो
हरा ॥ ॥ प्रकृतिऔरपुरुखकों छेत्रछेत्रज्ञकहाय ॥ यहजानकी
लालसा ग्यानजग्यपुनिकाज॥ ॥ ओवी ॥ ॥ अर्जुनह्मणेदेवा॥प्र
कृतिपुरुषांचियाभावा ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञनिवडावा॥ज्ञानज्ञेयइच्छितों ॥
॥ अभंग ॥ ॥ देवशिरोरत्नायोगियाचिद्रत्ना॥ऐकावेंजीप्रश्नाद्दुर्बळा
च्या ॥१॥ ययादेहामाजीठाणेदारराजी॥बसलेतेआजीचाळवीती ॥
॥ २ ॥ ऐसेंकांहींभासेतरीबोलाकैसें॥प्रकृतिविलासेआणीपुरुष ॥
॥ ३ ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञातेंकळोंहेंइच्छितें॥ज्ञानहीज्ञेयतेंतुकाह्मणे ॥ ४ ॥

श्लोक १

श्रीभगवानुवाच

इदंशरीरंकौंतेयक्षेत्रमित्यभिधीयते ॥
एतद्योवेत्तितंप्राहुःक्षेत्रज्ञइतितद्विदः ॥

समश्लोकी १

देहहाक्षेत्रह्मणुनी कौंतेयाह्मणिजेतसें ॥
क्षेत्रज्ञजोयासिजाणे तद्वत्तेबोलतीअसे ॥

आर्या १

हेंतंवशरीरपार्था वर्णियलेंक्षेत्रतत्त्ववेत्त्यांनीं ॥
त्यातेंजाणेबाजो तोचिक्षेत्रज्ञबोलिलात्यांनीं ॥

दोहरा १

छेत्रकहतयादेहको अर्जुनग्यानीलेत ॥
जानतहयादेहकों सोछेत्रज्ञजुहोय ॥

ओवी १

श्रीकृष्णह्मणेपार्थापरियेसी ॥ हेंदेहक्षेत्रजाणावेंयांसी ॥
हेंजाणेजोनेमेंसी ॥ तोक्षेत्रज्ञह्मणावा ॥

अभंग १

षड्गुणालंकृतभगवानबोलत ॥ लावीबापाचित्तसांगतोंगा ॥ १ ॥
शब्दाच्याआशंकाअल्याभेऊंनका॥पूतनासविखाजिवींलीम्या॥२॥
देहहेंचक्षेत्रह्मणुनीपवित्र ॥ ह्मणिजेतेंविचित्रकुंतीपुत्रा ॥ ३ ॥
यासजोजाणेलक्षेत्रज्ञहोईल ॥ तद्वत्त्याचाबोलऐसातुकी ॥ ४ ॥

श्लोक २

क्षेत्रज्ञंचापिमांविद्धिसर्वक्षेत्रेषुभारत ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानंयत्तज्ज्ञानंमतंमम॥

समश्लोकी २

क्षेत्रज्ञसर्वक्षेत्रींजो तोहीमीजाणभारता ॥
दोहींतजेंज्ञानत्याचें ज्ञानतेंमजसंमत ॥

आर्या २

क्षेत्रज्ञसर्वभूतीं जोतोमीजाणनकरिअनुमान ॥
क्षेत्रक्षेत्रज्ञांचें ज्ञानचिजेंहोयतेंमलामान ॥

दोहरा २

सोमसरूपजुआतमा बसतसबनकेदेह ॥
यहग्यानकोंजानिवो मेरेमतहैयेह ॥

ओवी २

क्षेत्रक्षेत्रज्ञदोन्हीं ॥ दोहींचाजाणताह्मणोनी ॥
तोचिह्मणिजेज्ञानी ॥ तोमजमानला ॥

अभंग २

क्षेत्रज्ञसर्वांचेंजोतोनिश्चयाचें ॥ मीचऐसावाचेंसांगतोंगा ॥ १ ॥
भारतातूंजाणनधरीअनुमान ॥ दोहींतजेंज्ञानज्याचेंअसे ॥ २ ॥
तेंज्ञानमाझेचीगोष्टीसंमताची ॥ तुकाह्मणेतेंचीबोलेलकीं ॥ ३ ॥

श्लोक ३

तत्क्षेत्रंयच्चयादृक्चयद्विकारियतश्चयत्॥
सचयोयत्प्रभावश्चतत्समासेनमेशृणु॥

समश्लोकी ३

तेंक्षेत्रजेंजसेंजाणे विकारीजेंजयास्तव ॥
क्षेत्रज्ञजोज्याप्रकारें संक्षेपेंतेंहिआइक ॥

आर्या ३

तंक्षेत्रहोयजेथुनि जयाविकारंजसेंहिसंक्षेपें ॥
तूंऐकज्याप्रभावें युक्तक्षेत्रज्ञहेंहिसंक्षेपें ॥

दोहरा ३

छेत्रज्ञहातेंहैभयो जोहैजैसेंभाय ॥
यहविकारयामाजहै कहोसंक्षेपसुनाय

ओवी ३

तंक्षेत्रकैसेंजाणिजे ॥ आणिक्षेत्रज्ञकासयाह्मणिजे ॥
यादोंहींच।निवाडावोजे ॥ संक्षेपेंआइक ॥

अभंग ३

तंक्षेत्रजेंजैसेंज्यानेंकल्पीलेंसें ॥ विकारीजेंजैसेंजयास्तव ॥ १ ॥
क्षेत्रज्ञतोजाणप्रकारेचखूण ॥ संक्षेपलक्षणसांगूंऐक ॥ २ ॥
तुकाह्मणेहीतसांगेभगवंत ॥ मायीकसाद्यंततोडावया ॥ ३ ॥

श्लोक ४

ऋषिभिर्बहुधागीतंछंदोभिर्विविधैःपृथक् ॥
ब्रह्मसूत्रपदैश्चैवहेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥

समश्लोकी ४

ऋषीश्वरींबहुविधीं वेदींकरुनिवर्णिलें ॥
युक्तसिद्धांतवचनीं ब्रह्मसूत्रींकरूनियां ॥

आर्या ४

बहुधावर्णितऋषिनीं सुज्ञानींहीअनेकविधश्रुतित ॥
तेंब्रह्मसूत्रपादें सहेतुकेंनिश्चयात्मकेंगीत ॥

दोहरा ४

रुखिनकह्योबहुभांतिजो औरवेदनहिभाख ॥

यहवेदनेनिश्चयकरी कह्योउपनिखदसाख ॥

### ओवी ४

ऋषीहींबहुतींसांगितलें ॥ वेदविधीबोलिलेवेगळाले ॥
उपनिषदींनिश्चितकेलें ॥ हेंसत्यजाण ॥

### अभंग ४

ऋषीश्वरींबहु विधस्वानुभवु ॥
वेदीकसमूहू वर्णालेंसे ॥ १ ॥
नानायुक्तीत्यांच्या भाषागीर्वाणीच्या ॥
सिद्धांतगर्भीच्या ठेवण्याज्या ॥ २ ॥
वाक्याचेप्रबंध ब्रह्मसूत्रबोध ॥
करूनीविवीध आपादीलें ॥ ३ ॥
तुकाह्मणेवाणी प्राकृतशिराणी ॥
झालीहेकाहाणी नकाह्मणूं ॥ ४ ॥

### श्लोक ५

महाभूतान्यहंकारोबुद्धिरव्यक्तमेवच ॥
इंद्रियाणिदशैकंचपंचचेंद्रियगोचराः ॥

### समश्लोकी ५

महाभूतेंअहंकार बुद्धिअव्यक्तआठहे ॥
दशेंद्रियेंएकमन शब्दस्पर्शादिपंचक ॥

### आर्या ५

पंचमहाभूतेंही बुद्धीअव्यक्तअणिअहंकार ॥
एकादशेंद्रियेंतें पंचविषयकरितिजेबहुविकार ॥

### दोहरा ५

महाभूतअहंकारबुधि औरमायाहीजान ॥

एकादशेंद्रियविखें पंचअगोचरमान ॥

## ओवी ५

महाभूतेंआणिअहंकार ॥ बुद्धिअव्यक्तअसेथोर ॥
दशेंद्रियांचाविस्तार ॥ पांचइंद्रियविषयजाण ॥

## अभंग ५

महाभूतेंपांचअहंकारसाच ॥ जाणपांऐसाचबुद्धिभेद ॥ १ ॥
अव्यक्तआठवेंहेंतर्कचीध्यावें ॥ इंद्रियमेळावेंविपंचक ॥ २ ॥
मनत्याअगळेंशब्दस्पर्शकळे ॥ पंचकप्रबळेंविषयीक ॥ ३ ॥
तुकाह्मणेऐसेंचोवीसयामीसें ॥ मीचजीवभासेंवाचाद्वारें ॥ ४ ॥

## श्लोक ६

इच्छाद्वेषःसुखंदुःखंसंघातश्चेतनाधृतिः ॥
एतत्क्षेत्रंसमासेनसविकारमुदाहृतम् ॥

## समश्लोकी ६

संघातयाचोविसांचा क्षेत्रइच्छासुखासुख ॥
द्वेषप्रतीतिवृत्तीची धारणातद्विकारहे ॥

## आर्या ६

संघातचेतनाधृति वैरेच्छादुःखसौख्यहिविकारी ॥
क्षेत्रतुलासंक्षेपें कथिलेंहेंतूंअहेसिअधिकारी ॥

## दोहरा ६

इच्छासुखदुखचेतना द्वेंसधीरताहोय ॥
यहजुकसोसंछेपसों छेत्रग्यानतूंलेय ॥

## ओवी ६

इच्छाद्वेषसुखदुःख ॥ देहचेतनाधृतिदेख ॥
इतुकियांतेंक्षेत्रह्मणतीआइक ॥ बुद्धिवंतमी ॥

## अभंग ६

द्विद्वाशऐसीमिळणीसंघातासी ॥ क्षेत्रइच्छातैसीसुखासुखें ॥ १ ॥
द्वेषप्रतीतीहेध्वत्तीचीसत्यहे ॥ धारणाजाणहेतद्विकारू ॥ २ ॥
तुकाह्मणेऐसेंखटलेंसांचलेंसें ॥ तेथेंचालेकैसेंशाहाणीव ॥ ३ ॥

## श्लोक ७

अमानित्वमदंभित्वमहिंसाक्षांतिरार्जवम् ॥
आचार्योपासनंशौचंस्थैर्यमात्मविनिग्रहः ॥

## समश्लोकी ७

श्लाघेचादंभहिंसेचा त्यागक्षांतिअवक्रता ॥
भक्तिश्रीगुरुचीशौच स्थिरताचित्तनिग्रह ॥

## आर्या ७

मानत्यागअदंभ क्षांतिसरळतातशीचहिंअहिंसा ॥
स्थैर्यमनोजयशुचिता गुरुसेवाकरितितापजेहिंसा ॥

## दोहरा ७

छमासरळताजोदंभता हिंसामदअभिमान ॥
गुरुसेवासंजमकरन थिरताशौचप्रधान ॥

## ओवी ७

अहंकारनादंभादिधरी ॥ हिंसानकरीशांतिआर्जवकरी ॥
गुरूचेंभजनअंतरीं ॥ पवित्रपणेंअंतःकरणनिरोधी ॥

## अभंग ७

श्लाघेचाआधारदंभहीसाचार ॥ त्यागशांतिसारअवक्रता ॥ १ ॥
भक्तिश्रीगुरूचीस्वामीणगुणाची ॥ कीज्ञानमार्गीचीदिवटीजे ॥ २ ॥
शौचस्थिरत्वगाचित्तनिग्रहोगा ॥ आणीवीतरागाविषयांच्या ॥ ३ ॥
वैराग्यआसावेंनिरहंकारभावें ॥ तरीसुखभोगावेंतुकयाचें ॥ ४ ॥

## श्लोक ८

इंद्रियार्थैषुवैराग्यमनहंकारएवच ॥
जन्मम्टत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥

## समश्लोकी ८

विषयांमाजिवैराग्य निरहंकारसर्वदा ॥
जन्ममृत्युजरारोग दुःखहेदोषपाहणें ॥

## आर्या ८

त्यागअहंकाराचा अणिवर्जनइंद्रियार्थतोषाचें ॥
दर्शनघडीघडीही जन्मजराव्याधिदुःखदोषांचें ॥

## दोहरा ८

बिखयनसोंबैराग्यधरी तजेरहेअहंकार ॥
जनममरनसुखदुखजरा व्याधिदोखनिरधार ॥

## ओवी ८

विषयवैराग्यसुखदुःख ॥ अहंकारहाहीदेख ॥
जन्ममरणव्याधिदुःख ॥ यांचेंठायींदोषदर्शन ॥

## अभंग ८

जन्महाओखटाअद्वैतींवसोटा ॥ झालाबारावाटाउधळीजो ॥ १॥
मळमूत्रींशीणलायोनिद्वारेंआला ॥ पुढेंगंधीयालायोनीचींगा॥२॥
लाचावलाहाटीसोडीनापिनकूटी ॥ मागेंपुढेंदाटीतीचीकरी ॥ ३ ॥
ऐसेंजन्मजाणेतेणेंन्यायेंमरणें ॥ जरारोगघेणेंनित्यदुःख ॥ ४ ॥
हादोषपाहातोतोहाज्ञानीहोतो ॥ मुक्तलीलेंजातोतुक्याऐसा ॥५॥

## श्लोक ९

असक्तिरनभिष्वंगःपुत्रदारगृहादिषु ॥

नित्यंचसमचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥

समश्लोकी ९

असक्तलिप्तनाहोणें पुत्रदारगृहादिकीं ॥
अनिष्टइष्टहीहोतां समचित्तत्वसर्वदा ॥

आर्या ९

सक्तनहोतांअसणें अलिप्तसर्वत्रदारसुतगेहीं ॥
समचित्तनित्यहोणें इष्टानिष्टोपपत्तियोगेंही ॥

दोहरा ९

नेहनपुत्रकलत्रसों तादुखेंदुखिनहोय ॥
चित्तमेंधरिसमानता भलेबुरेकोंखोय ॥

ओवी ९

स्त्रीपुत्रगृहाचेठायींसंगरहित ॥ विषयींनाहींआसक्त ॥
इष्टअनिष्टाचेठायींचित्त ॥ समचिअसे ॥

अभंग ९

असक्तझालीयालिपेनकुरुराया ॥ पुत्रकिंवाजायापडेदृष्टी ॥ १ ॥
चांगलेंसदनसामग्रीसाधन ॥ इष्टत्वादिकरूनअनिष्टादी ॥ २ ॥
इष्टझाल्यावरीफुगारानधरी ॥ समानचीबरीवृत्तिराखे ॥ ३ ॥
सखयासुमित्रापार्थाक्षत्रपुत्रा ॥ सर्वदायापत्रावाचीतुका ॥ ४ ॥

श्लोक १०

मयिचानन्ययोगेनभक्तिरव्यभिचारिणी ॥
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥

समश्लोकी १०

अद्वैतयोगेंमद्रूपीं भक्तिअव्यभिचारिणी ॥
कंटाळणेंलोकसभे एकांतीवसणेंसदा ॥

## आर्या १०

पार्थाअनन्ययोगें अव्यभिचारीमतीसममभजनीं ॥
तैसीयाजनसंगीं अप्रीतिप्रीतिपांडवाविजनीं ॥

## दोहरा १०

अढळभक्तिमोमेंधरे सबकोंआतमजान ॥
रहेसदाएकांतमें जैसेसभासदमान ॥

## ओवी १०

असाधारणयोगेंकरूनी ॥ दृढभक्तिधरूनी ॥
एकांतस्थळींबैसोनी ॥ प्रीतीनाहींलोकाठायीं ॥

## अभंग १०

अद्वैतयोगाचेंभजनयाचें ॥
माझीयारूपाचेंलागेवेड ॥ १ ॥
भक्तीचीसिराणीपरीअव्यभिचारिणी ॥
कांतापुण्यखाणीनाथसेवे ॥ २ ॥
एकांताचीप्रीतीजनपदींखंती ॥
कांटाळाज्याचित्तीराजसभे ॥ ३ ॥
तुकाह्मणेजीणेंधन्यझालेपणें ॥
लोहेंपालटणेंपरीसेंनी ॥ ४ ॥

## श्लोक ११

अध्यात्मज्ञाननित्यत्वंतत्त्वज्ञानार्थदर्शनम् ॥
एतज्ज्ञानमितिप्रोक्तमज्ञानंयदतोऽन्यथा ॥

## समश्लोकी ११

अध्यात्मबोधींनित्यत्व जडींज्ञानार्थपाहणें ॥
हेंज्ञानसाधनेंयांचीं उलटींअज्ञलक्षणें ॥

## आर्या ११

अध्यात्मज्ञानरती तत्त्वज्ञानार्थदृष्टिहेंज्ञान ॥
कथिलेंतुजम्यापार्था जेंयाव्यतिरिक्ततेंचिअज्ञान ॥

## दोहरा ११

अध्यातमग्यानधरे तवग्यानकोंदेख ॥
यहसबजोंमेकछुकहे यहग्यानअवरेख ॥

## ओवी ११

अध्यात्मींतत्परहोणें ॥ तत्त्वज्ञानेंविषयातेंनेमणें ॥
जाणवेचेंजेंजाणणें ॥ उलटींअज्ञानलक्षणें ॥

## अभंग ११

अध्यात्मविचारेंबोधाजाणेंखरें ॥ परीतेंप्रखरेंनित्यत्वगा ॥ १ ॥
जईंअजडहेंनिवडीसंदेहें ॥ हाचिअर्थपाहेनिजज्ञानीं ॥ २ ॥
पार्थाहींलक्षणेंशुद्धज्ञानीहोणें ॥ आमुचेंराहणेंतयागर्भीं ॥ ३ ॥
हाचीउलटायोगअज्ञानप्रयोग ॥ तुकाह्मणेसोंगवायांजाये ॥४॥

## श्लोक १२

ज्ञेयंयत्तत्प्रवक्ष्यामियज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते॥
अनादिमत्परंब्रह्मनसत्तन्नासदुच्यते॥

## समश्लोकी १२

आतांसांगेनजेंज्ञेय मुक्तिज्ञानेंजयाचिया ॥
नआदिअंतजेंशुद्ध ब्रह्मतेंसत्नतेंअसत् ॥

## आर्या १२

कथितोंजेंज्ञेयतुला जाणुनियांअमृतपावतीसत्य ॥
तेंब्रह्मअनादिपरम नस्थूलनासूक्ष्मतेंअसेनित्य ॥

## दोहरा १२

कह्योअमृतसमजानिके जातेंमुगतीजुहोय ॥
कारनकारजतैंपरो आदिब्रह्मकोंजाय ॥

## ओवी १२

आतांसांगतोंज्ञेय ॥ भक्तिज्ञानेंहोयजय ॥
आदिअंतशुद्धहोय ॥ ब्रह्मसतअसतनसे ॥

## अभंग १२

आतांतूंह्मणशीज्ञेयवार्त्ताकैसी ॥ ततूंश्याकर्णासीलावीतसों ॥ १ ॥
जयाज्ञानेंमोक्षआतुडेप्रत्यक्ष ॥ नउरेत्यालक्षचौऱ्याशींगा ॥ २ ॥
अनादीअनंतशुद्धाशुद्धिदेत ॥ जेथेंमुरेचित्तचांचल्यता ॥ ३ ॥
नसतनासतउचितसंवाद ॥ तुकाह्मणेभेदनिमेजेथें ॥ ४ ॥

## श्लोक १३

सर्वतःपाणिपादंतत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥
सर्वतःश्रुतिमल्लोकेसर्वमावृत्यतिष्ठति ॥

## समश्लोकी १३

तेंरज्जुहेंसर्पहात पायनेत्रशिरेंमुखें ॥
सर्वत्रतेंश्रोत्रयुक्त सर्वव्यापूनितेंअसे ॥

## आर्या १३

सर्वत्रपादकरजें तैसेंसर्वत्रहोउदाराहे ॥
सर्वत्रनयनशिरमुख सर्वव्यापूनिजेंसदाराहे ॥

## दोहरा १३

सबहीकरणशिर त्योंहीमुखद्रिगकान ॥
व्यापरह्योसबजगतमों मोहिदसोदिसजान ॥

## ओवी १३

सर्वत्रहातपायदिसती ॥ शिरेंमुखेंतयाअसती ॥
नेत्रकर्णसर्वत्रभासती ॥ दशदिशाव्यापूनिअसे ॥

## अभंग १३

तेंदोरअहीयादेहाचियाठायां ॥ पायनेत्रतयाशिरेंमुखें ॥ १ ॥
सर्वत्रतेंश्रोत्रयुक्तचिपवित्र ॥ व्यापूनिसर्वत्रअसेतेजें ॥ २ ॥
वैष्णवांच्यारायाऐकेशब्दायया ॥ श्रुतिसंमतीयामिळेस्मृती ॥३॥
आतांयाचबोलेहोईलरूपकेलें ॥ द्वयलोकींभलेंमानीतुका ॥४॥

## श्लोक १४

सर्वेंद्रियगुणाभासंसर्वेंद्रियविवर्जितम् ॥
असक्तंसर्वभृच्चैवनिर्गुणंगुणभोक्तृच ॥

## समश्लोकी १४

सर्वेंद्रियांविरहित विषयेंद्रियभासक ॥
जीवत्वींगुणभोक्तेंतें जेंसर्वाधारनिर्गुण ॥

## आर्या १४

जेंसर्वेंद्रियवर्जित करिसर्वेंद्रियगुणप्रकाशातें ॥
सर्वाधारअसक्तहि निर्गुणपरिभोगितोगुणांशातें ॥

## दोहरा १४

सबबिखयनतेंरहित सबताकोंअभ्यास ॥
संगबिनासबकोंधरें निरगुनकेपरकास ॥

## ओवी १४

सर्वेंद्रियगुणभासती ॥ परीइंद्रियेंतयाठायींनसती ॥
असक्तअसोनिसर्वाभूतीं ॥निर्गुणहोवोनिगुणभोगी ॥

## अभंग १४

इंद्रियेंज्यासत्तेंविषयासघेती ॥ किवावोळखतीखोटेंचांग ॥ १ ॥
विषयइंद्रियेंभासकझालेंजें ॥ परीनाविरजेजयामाजी ॥ २ ॥
जीवितीकिवारेगुणभोगाठायीं ॥ दीपवतपाहीसाक्षीसदा ॥ ३ ॥
जेकांरायाऐसेंनिर्गुणह्मणावें ॥ तुक्यानेंजाणावेंसर्वाधार ॥ ४ ॥

## श्लोक १५

बहिरंतश्चभूतानामचरंचरमेवच ॥
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयंदूरस्थंचांतिकेचतत् ॥

## समश्लोकी १५

बाह्यांतरंगभूतांचे तेंचिस्थावरजंगम ॥
अतींद्रियत्वेंअकळ दूरितेंतेंचिसंनिध ॥

## आर्या १५

भूतींअंतर्बाह्य व्यापकजेंचरहिआणितेंअचर ॥
नकळेसूक्ष्मह्मणोनी संनिधवर्त्तीतसेंहिदूरतर ॥

## दोहरा १५

जतजितेंचरहुअचर अंतर्बहिरसोई ॥
सवतेंदूरिसोंनिकटहै सूछमलखेनकोई ॥

## ओवी १५

भूतींअसेअंतर्बाह्य ॥ चरआणिअचरहीहोय ॥
सूक्ष्मह्मणोनिजाणावयाशक्य ॥ दूरिअसोनिजवळतें ॥

## अभंग १५

ब्रह्मअंतरंगसर्वभूतांलागीं ॥ वायुनभअंगींव्यापकत्वें ॥ १ ॥
स्थावरजंगमतेणेंन्यायेंवागे ॥ शून्यतरीजागेसर्वकाळ ॥ २ ॥

अतींद्रियपणेंआकळेयोगींद्रा ॥ दूरीजेकांइंद्रासंनिधतें ॥ ३ ॥
तेथेंतोघेणारानिवडीततुका॥जोकांझालाअसकानिकामुका॥४॥

## श्लोक १६

अविभक्तंचभूतेषुविभक्तमिवचस्थितम्॥
भूतभर्तृचतज्ज्ञेयंग्रसिष्णुप्रभविष्णुच ॥

## समश्लोकी १६

नसोनिवेगळेंभूतीं वेगळेंसेंहिजेंअसे ॥
गिळीउगळीहींभूतें धरीहीज्ञेयजाणतें ॥

## आर्या १६

भिन्नहिनसोनिभूतीं भिन्नापरिराहतेंसमयासी ॥
तेंज्ञेयहिभूतांचें पोषकअणिनिर्मुनीजगत्रासी ॥

## दोहरा १६

तामेंभेदकछुनहि सबतेंरहतविभाग ॥
उपजावतनासतसब नपावतकरिअनुराग ॥

## ओवी १६

भूतांचेठायींअविभक्तअसे ॥ परीविभक्तपणेंदिसे ॥
गिळीउगळीअनायासें ॥ धरीजाणोनीं ॥

## अभंग १६

नसोनीवेगळेंभूतमात्राठायीं ॥ वागेहेंनवाईअसंभाव ॥ १ ॥
ऐसाजैसेवीतोवेगळीचीपणें ॥ त्याचेंकायकोणेंकीजेलगा ॥ २ ॥
गिळीनोउगळीसर्वभूतांतोची ॥ परीनाघेत्याचीवोकरवण ॥ ३ ॥
तोचीज्ञेयरूपतुकाह्मणेपाहे ॥ धरीहीमहीहिंऐसेंबळ ॥ ४ ॥

## श्लोक १७

ज्योतिषामपितज्ज्योतिस्तमसःपरमुच्यते॥

ज्ञानंज्ञेयंज्ञानगम्यंहृदिसर्वस्यधिष्ठितम् ॥

## समश्लोकी १७

प्रकाशीअंधकारातें असोनिज्योतिवेगळी ॥
ज्ञानज्ञेयज्ञानलभ्य सर्वचित्तींअधिष्ठित ॥

## आर्या १७

ज्योतींतज्योतिअसें वर्णियलेंपांडवातमापरतें॥
ज्ञानज्ञेयज्ञान प्राप्यहिसर्वांतरींनयापरतें ॥

## दोहरा १७

जोतनहुकीजोतमें अंधकारतेंपार ॥
ग्यानजानीवोहियमें सबहीकोंनिरधार ॥

## ओवी १७

ज्योतींतजेंज्योती ॥ अज्ञानाहूनिपरबोलती ॥
ज्ञानज्ञेयअसेंह्मणती ॥ सर्वचित्तींअधिष्ठूनिअसे ॥

## अभंग १७

जेंकांहींप्रकाशआत्मातोतयाचा ॥ कांजेरंगत्याचापालटेना ॥१॥
अंधाराचेंकुंडेंकाळोखेंनिजबीज॥ असोनीनिस्तेजज्योतिर्मय॥२॥
ज्ञानज्ञेयज्ञानलभ्यतेंअर्जुना ॥ सर्वहृद्भुवनासत्ताधार ॥ ३ ॥
अधिष्ठूनीऊरेजगत्रयांतजें ॥ नलागेअंतजैंवस्तुतुका ॥ ४ ॥

## श्लोक १८

इतिक्षेत्रंतथाज्ञानंज्ञेयंचोक्तंसमासतः॥
मद्भक्तएतद्विज्ञायमद्भावायोपपद्यते॥

## समश्लोकी १८

संक्षेपेंक्षेत्रहीज्ञान ज्ञेयहीबोलिलोंकमें ॥

होमाझाभक्तजाणूनि मत्स्वरूपासपावतो ॥

## आर्या १८

ऐसेंक्षेत्रज्ञान ज्ञेयहिउपदेशिलेंचिसंक्षेपें ॥
मद्भक्तजाणुनीहें मद्भावापावतीअविक्षेपें ॥

## दोहरा १८

छेत्रग्यानऔरगेयमैं ताकोंदियोबताय ॥
इनकेजानेजोभगत लहेसोमेरेभाय ॥

## ओवी १८

क्षेत्रआणिज्ञान ॥ ज्ञेयसांगीतलेंसंक्षेपेंकरून ॥
जोमाझाभक्तजाणोन ॥ माझाप्रसादपावे ॥

## अभंग १८

थोडक्यागोष्टीततुजआलीवदों ॥ पाल्हाळेंविवादोंऐसेनसे ॥ १ ॥
क्षेत्रसांगूनीयांज्ञानदर्शवीलें ॥ अज्ञानावर्णिलेंथोडक्यांत ॥ २ ॥
ज्ञेयतरीहेंचक्रमानेंबोलीलों ॥ भक्तांनेंभुललोंतुझ्यासख्या ॥ ३ ॥
मत्स्वरूपायाचेतोचीतुक्यासम ॥ जोकांजाणेंवर्मयाचेंवीरा ॥ ४ ॥

## श्लोक १९

प्रकृतिंपुरुषंचैवविद्ध्यनादीउभावपि॥
विकारांश्चगुणांश्चैवविद्धिप्रकृतिसंभवान्॥

## समश्लोकी १९

प्रकृतीआणिपुरुष जाणदोघेअनादिहे ॥
गुणांविकारांउत्पत्ति जाणप्रकृतिपासुनी ॥

## आर्या १९

पुरुषप्रकृतीदोनी जाणआनादीकधींनउद्भवती ॥
गुणआणिविकारहिते प्रकृतीपासावजाणसंभवती ॥

## दोहरा १९

मायापुरुखअनादिहै अर्जुनदोऊजान ॥
गुनबिकारसबजोभये मायाहीकेमान ॥

## ओवी १९

प्रकृतिपुरुषांचीस्थिती ॥ उभयवर्गअनादिअसती ॥
प्रकृतीपासूनिविकारहोती ॥ ऐसेंजाणतूं ॥

## अभंग १९

प्रकृतीआणीकपुरुषपैंद्वय ॥ ज्यांभेदींअद्वयविकारलें ॥१॥
अनादीचपार्थायांचीक्रीडादीसे ॥ जेथुनीउमसेभूतलोकु॥२ ॥
आतांरजसत्वतमादित्रिगुण ॥ विकारउत्पन्नझालाजीका॥३॥
तुकाजीणेंझालेंप्रकृतीपासूनी ॥ प्रकृतीअसूनीअक्षयीनसे॥४॥

## श्लोक २०

कार्यकारणकर्तृत्वेहेतुःप्रकृतिरुच्यते॥
पुरुषःसुखदुःखानांभोक्तृत्वेहेतुरुच्यते॥

## समश्लोकी २०

कर्तेपणींप्रकृतिहे हेतुहेकार्यकारणीं ॥
भोक्तृत्वींसुखदुःखांचा हेतुहापुरुषस्वयें ॥

## आर्या २०

हेप्रकृतिकार्यकारण कर्तृत्वींमथियलीसमजहेतू॥
तैसासुखदुःखांचा भोक्तृत्वींपुरुषबोलिलाहेतू ॥

## दोहरा २०

कारनकारजकरतहों मायाइनकोहेत ॥
दुखओरसुखकेभोगकों बहेपुरुखगहिलेत ॥

## ओवी २०

कार्यकारणकर्तृत्व ॥ तिहींचेंप्रकृतीसकारणत्व ॥
सुखदुःखभोगीपुरुषासहेतुत्व ॥ ऐसेंबोलिजे ॥

## अभंग २०

अगळीकदीसेइचेकर्तेपणीं ॥ पुरुषाकरणीचित्रदावी ॥ १ ॥
कार्यकींकारणहेतुप्रकृतीचा ॥ श्रवणेंजीवींचाबोधूपाहे ॥ २ ॥
सुखाआणीदुःखाच्याभोग्तृत्वींजोहेतु॥तुकाह्मणेहोतुपुरुषस्वयें॥३॥

## श्लोक २१

पुरुषःप्रकृतिस्थोहिभुंक्तेप्रकृतिजान्गुणान॥
कारणंगुणसंगोस्यसदसद्योनिजन्मसु॥

## समश्लोकी २१

गुणप्रकृतिचेभोगी प्रतिबिंबोनितज्जळीं ॥
नानायोनिनिमित्ताया पुरुषाभोगवासना॥

## आर्या २१

प्रकृतिस्थपुरुषहोउनि भोगीप्रकृतिगुणचिनेणुनीमाया ॥
अधमोत्तमयोनितही कारणगुणसंगयासजन्माया ॥

## दोहरा २१

पुरुखप्रकृतिमेंबैठके करतबिखेंकोभोग ॥
ऊचेनीचेजनमकों कारनगुनसंजोग॥

## ओवी २१

पुरुषप्रकृतिमाजीअसोन ॥ भोगीप्रकृतीचेगुण ॥
ऐसेंगुणसंगेंकरून ॥ नानायोनींजन्मतो ॥

## अभंग २१

भोगीप्रकृतीचेगुणांसिपुरुष ॥ तज्जळींविशेषविबूनियां ॥ १ ॥

नानाविधयोनीनिर्मीतयापार्था ॥ पुरुषासआस्थाभोगीवासु ॥ २ ॥
तुकाह्मणेभूलीसेवीलीउत्तमें ॥ संगीतयाभ्रमेजाणताह्मा ॥ ३ ॥

## श्लोक २२

**उपद्रष्टाऽनुमंताचभर्त्ताभोक्तामहेश्वरः ॥**
**परमात्मेतिचाप्युक्तोदेहेऽस्मिन्पुरुषःपरः ॥**

## समश्लोकी २२

जोद्रष्टाजाणताभर्ता परमात्मापरेशजो ॥
तोचिभोक्तादुजादेहीं पुरुषप्रतिबिंबजो ॥

## आर्या २२

द्रष्टाअनुमोदकही पुरुषहिभोक्तामहेशअणिभर्त्ता ॥
यापरिबोलियलातो यादेहाहूनिअसेपरअकर्त्ता ॥

## दोहरा २२

परमातमकोदेहतें न्यारोजानतलोय ॥
साछिभरताभोगता ईश्वरनिरगुनहोय ॥

## ओवी २२

पाहताअनुमोदनदेता ॥ ईश्वरपोषकआणिभोक्ता ॥
तोचिपरमात्माह्मणिजेतत्त्वतां ॥ देहींपरमपुरुषतो ॥

## अभंग २२

जोद्रष्टाजाणताभर्त्तापरमात्मा ॥ परेशचिदात्माअव्ययजो ॥ १ ॥
अर्जुनागातोचीदुजादेहीभोक्ता ॥ पुरुषअनुरक्ताप्रतिबिंबे ॥ २ ॥
मार्गदुर्लभतोजेथेंकांसांपडे ॥ तुकयासवेडेंजेणेंकेलें ॥ ३ ॥

## श्लोक २३

**यएवंवेत्तिपुरुषंप्रकृतिंचगुणैःसह ॥**

